


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका








८।२५ २६८८

अं. २५.२६.२८.२९

वर्ष ७ वे जानेवारी १९३४ अंक १ ला
वर्ष ७ वे एप्रिल १९३४ अंक २ रा
३ रा नाही
" " ऑक्टोबर १९३४ अंक ४ था
" " जानेवारी १९३५ अंक ५ वा

वर्ष ७ वे जुलै १९३४ अंक ३ रा नाही.

अनुक्रमणिका



॥ श्री ॥






महाराष्ट्र साहित्य परिषदेचें त्रैमासिक

# महाराष्ट्र साहित्य-पत्रिका

वर्ष सातवें ] चैत्र शके १८५६ [ अंक दुसरा

एप्रिल १९३४

संपादक

प्रो. दत्तो वामन पोतदार, बी. ए.





वार्षिक वर्गणी ट. ह. सह रु. ४-८ फुटकळ अंकास १ रु. ट. ख. निराळा



# महाराष्ट्र-साहित्य-परिषद्

## अधिकारी व अधिकारी मंडळें

प्राथमिक व दुय्यम शाळांतील वाचनालयांकरिता मुंबई सरकारने मंजूर केलेली

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

वर्ष ७ वें, अंक २ रा

## अनुक्रमणिका

# साभार स्वीकार

खालील ग्रंथ पत्रिकेकडे अभिप्रायार्थ आले आहेत. त्याबद्दल आम्ही आभारी आहों. सदर ग्रंथांवर म. सा. पत्रिकेंत यथावकाश अभिप्राय देण्यांत येतील.—संपादक

१ **गवाक्षगीत**— लेखिका—श्री. काशीताई नाटेकर, मुंबई. प्रकाशक--श्री. श्रीकृष्ण दामोदर कुलकर्णी, मुंबई ४. किंमत १० आणे.

२ **नागरिकनीतिः**— लेखक—श्री. श्री. वें. पुणतांबेकर, बनारस. प्रकाशक-वें. शा. बळकुंदी, नवभारत ग्रंथ माला, कांग्रेस नगर, नागपूर.

३ **राजाराम हायस्कूल मॅगेझिनः**— ( फेब्रुआरी १९३४ )

४ **कोल्हापूर जनरल लायब्ररीः**— [ सन १९३३ चा वार्षिक वृत्तांत. ]

५ **गोखले आणि—**:—लेखक व प्रकाशक-- पु. पां. गोखले, कऱ्हाड.

६ **सॉक्रेटीस आणि आगरकरः**—लेखक, पु. पां. गोखले, कऱ्हाड. प्रकाशक—ना. पां. कोल्हापुरे, कऱ्हाड.

७ **शाळा सोडल्यावरः**—लेखकः—पु. पां. गोखले, कऱ्हाड. प्रकाशकः—वा. का. घाटे.

८ **मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचा वृत्तांतः**— [ जाने. १९३२ ते डिसें. १९३३ ] प्रकाशक-- श्री. अं. गो. पुणतांबेकर, श्री. धुं. भा. वैद्य, श्री. वि. गो. फाटक, मुंबई. २

९ **वैदिक वैश्वानराग्निः**— लेखक व प्रकाशक--श्री. गोविंद नारायण दातार-शास्त्री, गुजर आळी, राजापूर ( जि. रत्नागिरी ). किं. ८ आणे.

१० **सुश्लोकगोविंदः**— लेखक व प्रकाशक--श्री. रामचंद्र चिंतामण श्रीखंडे, एम्. ए., बी. एस्., हुजुरबाजारांचा वाडा, कोल्हापूर. किंमत. १॥ रुपाया.

११ **व्यायामक्षेत्र व श्रीमंत महाराजसाहेबः**— लेखकः— राजरत्न प्रो. माणिकराव, बडोदें. प्रकाशक--शेठ हिरालाल छगनलाल, बाजवाडा, बडोदें. किं. १। रु.

१२ **आर्याबद्ध महाभारतः**— लेखक व प्रकाशक-नारायण नरसिंह फडणीस, जळगांव ( पू. खानदेश ), किंमत २ रुपये.

---

अनुक्रमणिका

# इतिहासाचार्य राजवाडे यांचा व्याकरणविषयक तर्कसंभ्रम

विद्वद्विवेकयोर्जाते विवादे ब्रूत पण्डिताः । बलाबलं परिज्ञाय मया श्रेयं किमेतयोः ॥

१ प्रस्ताव—दिवंगत वि. का. राजवाडे यांचे लेख संगृहीत करून छापले आहेत. त्यांत त्यांनी केलेलें दामलेकृत व्याकरणाचें परीक्षण आलें आहे. या परीक्षणाविषयी कांही विचार प्रथित करण्याची मला सूचना झाल्यावरून, मी पुढील विचार विद्वज्जनांपुढे नम्रपणें मांडीत आहें.

२ सूचना—राजवाडे यांचा अधिकार फारच मोठा आहे. शिष्टजनतेच्या अंतःकरणांत त्यांना एवढें उच्च स्थान प्राप्त झालें आहे की, त्यांचे विचार, त्यांचे विचार म्हणूनच, जनता प्रमाण मानिते. थोडक्यांत सांगणें म्हणजे राजवाड्यांची उक्ति म्हणजे वेदवचन असें मानण्यांत येतें. त्या उक्तीला विवेकाने पारखणें म्हणजे अब्रह्मण्यच होय. बरें. अशा प्रकारचें प्रामाण्य त्यांच्या उक्तीस कां यावें याचा विचार करितां असें दिसतें कीं, त्यांच्या कांहीं उक्ति जनतेस आकलनातीत असतात आणि असें आकलनातीतत्व म्हणजेच प्रमाणत्व अशी विचारसरणी लोकांत आढळते. अमूक हरिदास ब्रह्माचें निरूपण फार उत्तम करतो याची कसोटी कोणती म्हणाल, तर तें निरूपण मुळींच न कळणें अशी स्थिति आढळते. अशीच स्थिति राजवाड्यांच्या लेखांविषयी, निदान व्याकरणविषयक लेखांविषयी तरी, विद्वानांत आढळते. एरवीं पुढीलसारखे प्रयोग त्यांच्या लेखांचा उत्तम नमुना म्हणून जनतेपुढें ठेवण्यांत आले नसते. ते प्रयोग असे (१) 'राम मुलगी समारितो,' 'मुलगी लामारितो,' 'मुलगी तेंमारितो,' या प्रयोगांचें मूळ म्हणून 'रामः पुत्रिकां समारयति, परामारयति, प्रतिमारयति' असें राजवाड्यांनी दिलें आहे. यावरून त्यांचें म्हणणें असें कीं, स, ला, तें हे विभक्तिप्रत्यय क्रमाने सम्, परा, प्रति या कर्मप्रवचनीयांचे बनले आहेत. ही व्युत्पत्ति मला तर सर्वथा अतर्क्य वाटते. पण कांही विद्वानांस ती रुचते असें दिसतें; म्हणून तर ही व्युत्पत्ति नमुनेदार म्हणून मराठीचे व्याकरणकार व व्याकरणप्रबंधकार या पुस्तकांत उदाहृत आहे. (पान ३१६).

३ नम्र विनंती—वर सांगितल्याप्रमाणे सर्वथा तर्कातीत गोष्टी मान्य करण्यास माझें मन कचरतें व वरील गोष्टी भ्रान्त असाव्या असें वाटतें. पण विद्वज्जनांस त्या पटत असल्यामुळे, उलट माझा तर्कच मला भ्रान्त वाटतो. अशा संदेहप्रसंगीं मी गोंधळून गेलों आहें. तेव्हा या दोहोंत राजवाड्यांची उक्ति व माझा सारासार–विचार यांमध्ये अप्रमाद कोण आहे हें कृपाकरून विद्वानांनी मला सांगावें अशी मी त्यांना याचना करितों. राजवाडे चूक असें मी मुळींच म्हणत नाही. केवळ येथील माझी शंका विद्वानांनी दूर करावी एतदर्थ ती त्यांच्यापुढे मांडीत आहें.

४ शंका—दामले यांच्या तिङन्तविचाराच्या परीक्षणानें राजवाड्यांनी ६० पानें व्यापिलीं आहेत. यांत एकहि पान असें सांपडत नाही की, ज्यांत तर्कशक्तीला पदोपदीं ठेचा लागत नाहीत. या ठेचा अनेक प्रकारच्या आहेत. यांतील ठळकठळक पुढे उदाहृत करीत आहें.

( क ) मराठी अपप्रयोगः—म्यां जाऊं शकतो. ( राजवाडे–संकीर्ण निबंध पान १४ ), ती मरतानी म्हणाली ( २४ ), मी पाहिजा ( पान ४३ ). मला किंवा म्यां जाते ( ५२ ). म्या काम करत आहे ( ५५ ) हे प्रयोग चूक आहेत असें मला वाटतें. हे प्रयोग आपण बोलतांना करीत नाही. हे प्रयोग हल्लीं होतात की नाही हें सांगण्याचा कोणाहि विद्वानास, मराठी भाषेच्या पुत्रास, अधिकार आहे. राजवाडे हे असलेच एक पुत्र आहेत. अर्थात् त्यांनाहि अधिकार आहे; पण म्हणून हे प्रयोग खरेच असले पाहिजेत असें मात्र म्हणतां येत नाही. कारण हे प्रयोग त्यांनी स्वकृतप्रतिपादनाच्या समर्थनार्थच दिलेले आहेत. इतरत्र त्यांच्या लेखांत ते आढळते तर ते विचारणीय ठरते. सारांश, असल्या प्रयोगांवरून स्वमतसिद्धीसाठी 'दडपून देतों ऐसा जे' हीच त्यांची वृत्ति दिसून येते.

५ ( ख ) व्युत्पत्तीचे नमुने (?) ' वाचणेस येतें ( ज्ञायते ) ( १४ ). २ त्वां मला जाऊं दिलें ( ज्ञातम् ) ( १५ ). ३ हरिश्चंद्र नामें राजा झाला ( स्तः ) ( ३४ ). ४ मी पाणी घातलें ( घातितम् ) ( ४४ ). ५ तो सुजतो ( क्षुन्ते ) ( ४८ ). ६ तो व्याकरण म्हणत ( मन्वानः ) आहे ( ५४ ). ७ फिरावयास ( स्फोरयितुम् ) जातो. ( ६७ ). ८ काटक्या भिजतात ( भिद्यन्ते ) (६९). ९ सांडस ( साध्वासिः ) छिनते ( ६९ ).

यांचा थोडा विचार— १. दिवसं श्लोकः पठितः किन्तु न आयातः [ नाही आला ] असला प्रयोग कौमुदींत आहे. आता आ + इ = ए = ये अशी ये ची व्युत्पत्ति आहे; व ये हा संस्कृत 'आ + या' शीं समानार्थक आहे. पण राजवाडे म्हणतात येतो चें मूळ ज्ञा आहे ये नाही २. काव्यसंस्कृतांत 'त्वया मह्यं गन्तुं दत्तम्' असले प्रयोग कालिदासकृत ग्रंथांत आढळतात. अर्थात् दिलें चें मूळ दत्तम्. पण राजवाडे म्हणतात ज्ञातम् हें मूळ ३. राजा जातः = राजा झाला येथल्याप्रमाणे जातः याचें रूपांतर झाला असें मानण्यांत येतें. पण राजवाड्यांनी ठरविलें की अस् धातूचें भूतविशेषण स्त होतें. येथें भगवान् पाणिनि म्हणतो ' अस् चें भूतविशेषण होत नाही. राजवाडे म्हणणार ' होत नाहीं म्हणजे काय ? झालेंच पाहिजे. तें पाणिनीच्या शब्दसृष्टींत नसेल तर त्याच्याहि पूर्वीचें वैदिक किंवा वेदपूर्व असेल.' इतकेंहि करून स्तःचें 'झाला' कसें होणार ? नकाशा काढतांना किनारा दाखविण्यास मुलें पेन्सिल कागदास लावून हात कापवीत कापवीत रेषा काढितात; की झाला त्यांचा किनारा तयार. अशाच रीतीनें स्त या काल्पनिक रूपांतील स् आणि त या दोन्ही अवयवांना झाला या रूपाकडे एकदम फरपटीत आणावयाचें, वाटेंत लागणारे विकार सशास्त्र मानाव-

याचे व व्युत्पत्तींची सिद्धि कल्पावयाची. हें पुढीलप्रमाणे स्त = स् त = ज त = ज अ = जा + ( स्वार्थे ) ल = जाल. सारांश— जे जे म्हणून रूपविकार मध्यें घ्यावे लागतील, ते ते सर्व व्युत्पत्तिपूत मानावयाचे; एवढेंच राजवाड्यांचें व्युत्पादनतत्त्व दिसतें. हें तत्त्व फारच बलवत्तर आहे. वाटेल त्या शब्दावरून वाटेल तो शब्द या तत्त्वाने साधितां येईल. कारण दरम्यानचीं शब्दरूपें सशास्त्रच गृहीत धरावयाचीं. पण प्रस्तुत ठिकाणीं याच्याहि पलीकडला प्रकार आहे. मूळ घेतलेला स्त हा शब्दच मुळीं शशशृंगवत् अविद्यमान आहे. पण राजवाड्यांचा तर्क सर्व नियमांना अगोचर असल्याने त्याच्या जोरावर झाला हें भूतविशेषण म्हणून अस् धातूवर ते लादितात. ४. ( ग्रह्–ग्राह् ) ग्राहित—लें ( भूत प्रत्यय ) यावरून घातलें हें रूप प्राप्त होतें. ५. श्रि–शूयते ( कर्मणि ) = सुजतो ही शास्त्रशुद्ध व्युत्पत्ति आहे. ६. भण = म्हण. म्हण हें रूप मन्-वरून आलें नाहीं. ७. परि + इ = परी = ( स्वरविपर्ययाने ) फीर. येथे प्राप–फाव येथल्याप्रमाणे पकारांत महाप्राण शिरला आहे. यावरून ठरतें की, फीर याचें मूळ परी हें आहे, स्फोर् नव्हे. ८. अभ्यंज् = भीज. येथे आद्य अकार व उपान्त्य अनुनासिक गळाला आहे व यचें संप्रसारण झालें आहे. अरण्य—रान. येथे आद्य अ गळतो. विंशति–वीस. येथे अनुनासिक गळाला आहे. उद्यम—उदीम. यांत संप्रसारण होतें. या धर्तीवर अभ्यंज् = भीज असें सिद्ध होतें. भिद्–भीज यांचा संबंध रूपतः जरी सन्निहिततर आहे, तरी अर्थतः कांहीच नसल्यामुळे राजवाड्यांची व्युत्पत्ति चूक आहे. ९. साधु असिः छिनत्ति = तलवार चांगली कापते असा अर्थ असल्याने साध्वसिः = सांडस हें समीकरण तर्कातीत आहे. शिवाय संदंश = सांडस हें समीकरण सत्य दिसतें. रूपाने व अर्थानेहि सांडस हें रूप संदंश वरूनच आलें आहे. संदंश म्हणजे चिमटा; व सांडस याचाहि तोच अर्थ आहे. 'सांडस छिनते' हा प्रयोग केवळ राजवाड्यांच्या अफाट कल्पनासृष्टींतीलच दिसतो.

६ ( ग ) प्रामादिक रूपान्तर—( १ ) मला दूध पिऊं दे ( १५ ) = दुग्धं मे देहि पातवे. या ठिकाणीं, मह्यं दुग्धं पातुं देहि असें पाहिजे. 'बाष्पस्तु न ददात्येनां द्रष्टुं चित्रगतामपि' इत्यादि प्रयोग संस्कृतांत अनेक आढळतात. यांत पातुं अशा हेतुवाचकाचा प्रयोग आढळतो. मराठींतील ऊं प्रत्यय संस्कृतांतील तुम्—वरून आलेला निःसंशय दिसतो. त्याचा पातु–च्या चतुर्थीशीं कांही संबंध दिसत नाही. ( २ ) त्याला नकळत चोर निसटला ( ५८ ) = तमनाकलयन् चोरः निःसृतः ( राजवाडे ). या ठिकाणीं 'तस्य न कल्यमानः चोरः निःसृतः' असें पाहिजे. प्रस्तुतसारख्या वाक्यांत चोर हा नकळतचा कर्ता नसून कर्म आहे. अर्थात् त्याशीं सधर्म असणारें उपाख्यात ( Participle ) कर्मणि असलें पाहिजे.

७ ( घ ) मराठी व्याकरणासंबंधी दोष— ( १ ) मला वाचणेस येतें ( १४ ). येथे राजवाडे हें रूप कर्मणि मानतात, पण मुळांत ये धातु अकर्मक असल्याने येतें कर्मणि असणें शक्य नाहीं. ( २ ) जेवल्यास त्याला दहीं वाढ ( २४ ).

येथे जेवल्यास हें त्यालाचें विशेषण करून चतुर्थ्यन्त मानिलें आहे. पण हें चूक आहे. 'जेवल्यास, (क) तो सगळ्या पोळ्या खाईल, (ख) त्याशीं बोलत बस' इत्यादि वाक्यांत त्याला-चे ठिकाणीं अन्य विभक्ति येणें शक्य आहे. अशी विभक्ति आल्यासहि, 'जेवल्यास' हें रूप चतुर्थीच कसें राहणार? तें एकच रूप भिन्नभिन्न विभक्ति मानावें लागेल. अर्थात् जेवल्यास हें मुळी विशेषणच नाही. (३) पाहिजे त्या रस्त्यानें जा (४२). येथे राजवाडे पाहिजे ही तृतीया घेतात. कां? तर तें रस्त्याने चें विशेषण व रस्त्याने ही तृतीया. पण अशा ठिकाणीं पाहिजे त्या घरांत शीर, माणसास भेट असे प्रयोग असल्यास पाहिजे ही तृतीया कशी टिकणार! सारांश, मुळांत पाहिजे हें विशेषण मानणेंच चूक आहे. (४) 'त्याला शोभतें' (४७). यांतील शोभतें हें रूप कर्मणि किंवा भावे व त्याला ही तृतीया किंवा चतुर्थी (राजवाडे). हीच व्यवस्था (५) 'मला दिसतें' (४७)-येथील. (६) चालतांना पाय दुखतात (५८) येथें चालतांना हें पाय-चें विशेषण. (७) आज तुम्ही जाणें (६३). येथे तुम्ही ही प्रथमा (राजवाडे). पण तुम्ही ही तृतीया असावी. 'आज रामाने जाणें' हें आपण प्रशस्त मानितों. (८) मला त्याला पुस्तकें देणें पडतात (६४) यांतील पदविमर्श फारच नमुनेदार आहे. पहा-मला ही तृतीया किंवा चतुर्थी असून कर्ता, त्याला हें कर्म, देणें हें विशेषण व पुस्तकें हें कर्ता किंवा कर्म नसूनहि (Subject) धातुरूपेश; आणि पडतात हें क्रियापद कर्मणि. पड धातूला कर्म कधी कोणी ऐकिलें आहे? पण राजवाड्यांना त्याचें काय? त्यांना वेळीं जें स्फुरेल तेंच त्रिकालाबाधित सत्य! (९) तो गेल्याचें समजलें (६६)-समजलें हें भावे क्रियापद. भावे क्रियापदाचा कर्ता तृतीयान्त असावा लागतो ही गोष्ट राजवाड्यांस संमत दिसत नाही. (१०) त्याला घर बांधल्याला वर्ष झालें (६७) येथे राजवाडे म्हणतात घर बांधल्याला म्हणजे गृहबन्धाय; अर्थात् बान्धलें म्हणजे बांधणें व ल हा प्रत्यय स्वार्थक. परंतु ही सर्व मिथ्या कल्पना आहे. गृहं बद्धवतः तस्य वर्षं जातम् इत्यादि ठिकाणीं बांधलें-च्या स्थानीं संस्कृतांत भूतविशेषणाचाच प्रयोग करितात. यावरून बांधल्याला यासारखें रूप भूतविशेषणच ठरतें व ला प्रत्यय स्वार्थक ठरत नाही.

८ (ङ) तर्कदोष-(१) घेतलें, धुतलें (३१) हीं रूपें राजवाडे धातु व प्रत्यय यांच्यामध्ये त आगम कल्पून साधितात. पण हें चूक आहे. बसणें-बैठणें पावला-पातला, लाभणें-लाधणें या ठिकाणीं उपविश्-उपविष्ट, प्राप्-प्राप्त, लभ्-लब्ध यांवरून क्रमाने बस-बैठ, पाव-पात, लाभ-लाध हे धातु निघाले आहेत. अर्थात् कांही मराठी धातु संस्कृत धातूंवरून, तर कांही त्यांच्या भूतविशेषणावरून येतात. भूतविशेषण आरूढ-चा प्रयोग धातु म्हणून केलेला ज्ञानेश्वरींत 'आरूढौनि'मध्यें आढळतो (ज्ञा.९-४१०). येथे भूतविशेषणावरून मराठी धातु साधला असल्याने त मूळचा अवयव मानणें स्वाभाविक आहे. करितां असल्या रूपांत त हा आगम न मानितां, प्रस्तुत रूपें

भूतविशेषणावरून साधलेल्या नामधातूंचीं मानणें सयुक्तिक होईल. (२) पाऊस **पडला** तर अन्न मिळेल. ( ३३ ) येथे राजवाडे म्हणतात '**पडला** हें पतिष्यत्–वरून आलें आहे, पतित–वरून आलें नाही. पडला हें व्युत्पत्तिदृष्टया भविष्यत् उपाद्यात आहे, भूतोपाद्यात नाही'. या त्यांच्या तर्कसरणीला पुढील वाक्योदाहरणच ' मरिष्यामि विजेष्ये वा हृताश्चेत्तनया मम' पुरेसें उत्तर आहे. या वाक्यांत हृता: हें भूतविशेषण आहे. ( ३ ) **दृश् व पश्य्** ( ४८ ) यांतील पश्य् हा धातु राजवाडे दृश्–चा आदेश मानितात, स्वतंत्र धातू मानीत नाहींत. पण द् चा प् होणार कसा? अर्थात् पश्य् धातु स्वतंत्र आहे. केवळ व्याकरणाच्या सोईकरितां एक दुसऱ्याचा आदेश मानण्यांत आला आहे. जा चा भूतकाळ गेला व Go चा Went मानिला आहे. पण येथे एकावरून दुसरें **रूप** सिद्ध झालें आहे असें कोणीच मानीत नाही. जातो–मध्ये (या) जा, तर गेला–मध्ये गम् धातु आहे. Went मध्येंहि Wend धातु उघड आहे. अशा रीतीने भाषेंतील प्रयोगाकरिता लागणाऱ्या विशिष्टार्थक सर्व रूपांचा संग्रह साधण्याकरिताच, असले धात्वादेश अर्थापुरतेच मानण्यांत येतात. अर्थात् हे आदेश रूपदृष्ट्यां सर्वथा कृत्रिम होत; स्वाभाविक नव्हत. रूपतः ते मुळीच आदेश ठरत नाहीत. असें असून राजवाडे दृश् चा पश्य् हा आदेश मानून, असा आदेश न मानणाऱ्या दामल्यांची पुढील शब्दांत टवाळी करीत आहेत. ' संस्कृत व्याकरणाकडे मुळीच न पाहतां, हे आंधळे वैयाकरण व्यर्थ तंडत बसले आहेत!' ( ४ ) **त्याला** जाण्याला हरकत नाही (६६) येथे **त्याला** हा जाणें या धातूचा कर्ता आहे, या दामल्यांच्या विधानावर राजवाडे घसरून म्हणतात '**नामाच्या आंतील धातूला कर्ता असतो**' ही कोण विलक्षण व्याकृति! येथे दामल्यांचें म्हणणें सर्वथा निर्दोष आहे. ' रमणीया खलु व्याकरणस्य कृतिः **पाणिनेः पाणिनिना वा**, पयःपानं **भुजंगानां**, दुःखायेदानीं रामस्य दर्शनं **सुहृदाम्**' इत्यादि असंख्य ठिकाणीं असले प्रयोग वैयाकरणांनी व कवींनी प्रशस्त मानिले आहेत. येथील उदाहरणांत धातुज नामांस कर्ताच काय पण कर्महि आहे. वरील उदाहरणांत **सुहृदाम्** ही कर्तरि व **रामस्य** ही कर्मणि षष्ठी आहे. असल्या प्रयोगांकडे राजवाडयांचें लक्ष गेलेलें दिसत नाही. आपलें मनुजत्वसुलभ प्रमादशीलत्व मनांत वागवून, त्यांनी दामल्यांचा इतका उपहास करावयास नको होता. असो. ग्राह्य म्हणून एवढेंच की, मनुज प्रमादशील असल्याने एखादा ग्रंथकार चुकल्यास त्यावर इतक्या बेमुर्वतपणें कोणी घसरू नये. आपणहि मनुष्य असल्याने आपण चुकीस पात्र आहों हें लेखकांनी लक्ष्यांत ठेवावें.

९ ( च ) **प्रत्यर्थं मूलभेदः( ! )**—मराठीमध्ये काय, किंवा इतर भाषांतहि काय, एकाच शब्दाचे अथवा धातूचे लाक्षणिक अर्थ अनेक निघतात. अशा सर्व अर्थांमध्ये प्राथमिक अर्थ थोड्याफार अंशाने अनुस्यूत असतोच. अशा अनेक लाक्षणिक अर्थांचे मुळाशीं शब्दाचें मूळ भिन्नभिन्न मानण्याचें कारण नाही. ' रोग्याला चार दिवस जातील. हा रंग लौकर जाईल. वेळ फुकट जातो. तो स्वर्गाला जाईल. ती

काकाकडे जाते. त्याला अन्न जात नाही. राणीला नऊ महिने पुरे जातील. मी त्याला हिताचें सांगू जातों'—इत्यादि अनेक वाक्यांत जा—धातूचीं रूपें आहेत. यांतील सर्वच रूपांचे अर्थ परस्परांहून निरनिराळे आहेत. तरी पण या सर्व अर्थांमध्ये मूळ कल्पना एकच ओविलेली आहे, हें सूक्ष्मदर्शी विद्वानांस सहज पटेल. येथे जशीं जा—चीं रूपें निरनिराळ्या अर्थांत प्रयुक्त आहेत, तशींच लाग—चीं हीं रूपें प्रचारांत योजिलेलीं आढळतात. येथे राजवाडे समजतात की, प्रत्येक अर्थछटेचें मूळ निराळा धातु असला पाहिजे; व हें सिद्ध करण्याकरिता ते निरनिराळे धातु पुढे आणितात. 'हें प्रमाण येथे लागतें ( लाघ् ). मला साखर गोड लागते ( लक् ). भाकर घशाला लागते ( राख् ), मला दूध लागतें ( लाख् )'—असे कंसगत निरनिराळे धातु येथे मूळ म्हणून राजवाडे कल्पितात. पण येथे चारहि ठिकाणीं लाग—च्या अर्थांतील मूलभूत **संयोगादि**- कल्पना विद्यमान असल्याने, येथील सर्व अर्थछटा मूळ अर्थाचीं केवळ लक्षणाजन्य रूपान्तरें आहेत, स्वतंत्र अर्थ नाहीत, हें उघड होतें. मूलतः **स्पर्श**—हा अर्थ व्यक्त करणारा धातु **भासणें** या अर्थी योजिला जातो, ही गोष्ट पुढील वाक्यांत दिसून येते. 'विषयसुखानि मधुरतराणि आपतन्ति मनसः। (कादम्बरी १०३)--येथे, आ—पत् या धातूचा मूळ अर्थ 'येऊन पडणें' '**लागणें**' असा असून या वाक्यांत त्याचा अर्थ '**भासणें**, वाटणें' असा होत आहे. अशाच अर्थांतराने 'पाठीस लागणें' 'गोड लागणें' येथील लाग—चे अर्थ एकाच मुळावरून निघालेले सिद्ध होतात. सारांश—प्रचारांत मूळ अर्थापासून इतर अर्थ थोडयाबहुत फेरफाराने प्रवृत्त होतात. हे सर्व अर्थ एकाच मूळावर अधिष्ठित असतात. अर्थात् धातूची प्रत्येक अर्थछटा संस्कृतांतील भिन्न धातूपासून साधूं पाहणें हें केवळ पंडितंमन्यतेचें विजृंभण दिसतें.

१० ( छ ) **शंका**—धातूचे अनेक अर्थ असतांना, मूळ एकच घ्यावें, हें विधान मर्यादित आहे. असे अर्थ की, ज्यांमध्ये एकापासून दुसरा निघण्याचा संभव नसतो असे अर्थ, एकाच धातूने व्यक्त झाल्यास त्या धातूचीं मूळें प्रत्ययं भिन्नभिन्न असूं शकतात. हस्तेन **स्पृशति**, वाचा **पृच्छति**,—या वाक्यांतील दोन्ही क्रियापदांचें भाषान्तर मराठीमध्ये **पुसतो** या एकाच क्रियापदाने होतें. हाताने तोंड पुसतो व शब्दाने खुशाली पुसतो. येथे **पूस** हा धातु संस्कृतांतील क्रमाने स्पृश् व ( प्रच्छ् ) पृच्छ् अशा दोन धातूंवरून आला आहे. **सिव्**—शिवणें, **स्पृश्**—पिश्—शिप—शिवणें अशा परंपरेने **शिवणें** हाहि धातु द्विमूल आहे. या धातूचे अर्थ अन्योन्य—संलग्न नाहीत; एकापासून दुसरा निघाला अशी स्थिति नाही. अशा कांही थोडया ठिकाणीं मात्र, जेथे धातूचे अर्थ परस्परांपासून दूरभिन्न असतात तेथे, धातूचीं मूळें एकाधिक संभवतात. क्वचित् त्रिमूल असेहि धातु आढळतात. **वाह्, वाद्य, बाध** या तिन्ही संस्कृत प्रकृतींवरून **वाज** हें रूप मराठींत साधलें आहे. '**वाजतेया** वायूते' (ज्ञानेश्वरी ९।१२४) 'उदंडे सैंघ **वाजते**' (१।१२१) दोख आंगीं **वाजो** असति पांत ( १।२४१ )—या ठिकाणीं क्रमाने वाहणाऱ्या, वाजतात, बाधूं ( पीडा देऊं ) अशीं

रूपें, वाज या धातूवरून निघालेलीं ज्ञानेश्वरींत आहेत; ज्यावरून मराठी वाज हा धातु त्रिमूल आहे. चतुर्मूल धातु सांपडेल की काय, सांगवत नाही. तरी पण एवढें निश्चित की, मराठींतील कोणत्याहि धातूची व्युत्पत्ति चारांहून अधिक प्रकारीं संभवणार नाही. अशा स्थितींत राजवाडे धातूचीं मूळें अर्थभेदानुसार पांच नव्हे, दहा नव्हे, पंधरा, वीस, बावीस पर्यंत देतात. हें पाहून मन गोंधळून जातें; व ही मूळांची संख्या सर्वथा, पूर्णतः, साकल्येन, अश्रद्धेय आहे अशी मनाची दृढ समजूत होते. अर्थात् राजवाड्यांनी दिलेले मराठींतील लाग या धातूचे अनेक संस्कृत प्रभव सर्वस्वी त्याज्य ठरतात.

११ तर्कभ्रम—'मज ईश्वराचेनि लोभें' (ज्ञा. १८।१५०७) येथे 'लोभें' ही एकवचनी तृतीया; ईश्वराचेनि हें लोभें याचें एकवचनी तृतीयान्त विशेषण, आणि 'मज' हेंहि एकवचनी तृतीयान्त विशेषण 'लोभें' या शब्दाचें. 'मजबद्दल' 'माझेन' हें रूप चालतें. तात्पर्य, मज हें रूप एकवचनी तृतीयेचें आहे (पान १३)—येथे राजवाडे मज ही तृतीया सिद्ध करूं पाहतात. कशी? लोभें ही तृतीया. मान्य, लोभ कोणाचा? ईश्वराचा. ईश्वराचा हें विशेषण षष्ठ्यंत आकारांत आहे. ज्ञानेश्वरींत विशेष्याची तृतीया असल्यास, त्याच्या आकारान्त विशेषणाची ही तृतीया होते. 'काजाचेनि पाडे' (२।४८) येथे 'काजाचा पाड' याची तृतीया 'काजाचेनि पाडे' अशी आहे. येथे विशेषण आकारान्त व विशेष्य अकारान्त आहे. पैकी आकारान्त (वारा) शब्दाची तृतीया 'वारेनि (शोके) व (थेंब या) अकारान्ताची तृतीया 'थेंबें' (बिरे) (१३।६६५) या धर्तीवर काजाचेनि पाडें हीं रूपें झालीं आहेत. तृतीयान्त विशेष्यापूर्वी विशेषणाची तृतीया झाली आहे. अशा रीतीने विभक्तीचें समानत्व षष्ठ्यंताप्रमाणे, इतरहि आकारान्त विशेषणासंबंधाने आढळतें. 'मालवतेनि तपनें' (१५।३३४)—येथे मालवता या (षष्ठीभिन्न) विशेषणाची तृतीया आहे. असो. 'लोभें' च्या पूर्वींची ईश्वराचेनि ही तृतीया स्पष्ट आहे. पण ही विशेषण—तृतीया ईश्वराचा या शब्दाची आहे, ईश्वर या शब्दाची नाही. ईश्वराचा या विशेषणाच्या पोटांत ईश्वर हा शब्द आहे व या ईश्वर—शीं मी हा शब्द समानाधिकरण आहे. अर्थात् मी—ची विभक्ति वेळेस ईश्वर—च्या विभक्तीशीं तुल्य मानितां येईल; ईश्वराचा या शब्दाच्या विभक्तीशीं तुल्य मानितां येणार नाही. आता ईश्वराचा या षष्ठीपूर्वीं मज हें रूप षष्ठी नसून, मराठी भाषेच्या सरणीप्रमाणे केवळ सामान्यरूप आहे. आम्हां मुलांच्या खेळाला, खेळाने, खेळाहून, खेळाचा, खेळांत इत्यादि ठिकाणीं मुलांच्या या षष्ठ्यन्तापुढे द्वितीयेपासून सप्तमीपर्यंत कोणतीहि विभक्ति असतां, आम्हां हें एकच रूप पूर्वी येतें. त्यामुळे तें सामान्य ठरतें; यासच व्याकरणांत सामान्यरूप म्हणतात. अशाच रीतीने ईश्वराचेनि यांतील पोटविभक्ति असलेल्या (ईश्वराचा या) षष्ठी-पूर्वी असणारें (समानाधिकरण मी या शब्दाचें) रूप शुद्ध सामान्यरूप आहे, तृतीया किंवा चतुर्थी नाही. तसें असतें तर मज—चे स्थानीं म्यां, मला—असलीं रूपें ठेवितां

आलीं असतीं. तीं तशीं ठेवितां येत नसल्याने, मज तृतीया किंवा चतुर्थी नाही हें उघड आहे.

१२ शिवाय मज हें रूप लोभें याशीं समान विभक्तिक कसें होणार ? मजमधील मी या शब्दाने मूर्त पदार्थ बोधित होतो, तर लोभ याने अमूर्त. करितां मी आणि लोभ यांचें सामानाधिकरण्य संभवत नाही. मी आधार, व लोभ आधेय आहे. मी जर समानाधिकरण्य नाही, तर समान-विभक्तिकहि होणार नाही. शंका—राजवाडयांनी तरी, मज ही धडधडीत चुकीची वाटणारी तृतीया, तृतीया म्हणून का ठरवूं पाहावें ? उत्तर—त्यांना 'मला फूल दिसतें' इत्यादि वाक्यांत मला हा तृतीयान्त कर्ता व दिसतें हें कर्मणि क्रियापद ठरवावयाचें आहे म्हणून. येथे ठरवूं पाहिलेला सिद्धांत व तदर्थ कल्पिलेलें साधन दोन्ही प्रामादिक आहेत. दिस हा धातु उघड-उघड अकर्मक आहे. तरी पण राजवाडे त्यास सकर्मक मानून दिसतें हा कर्मणि प्रयोग व तो वर्तमान-कालीन असें मानीत आहेत. अशा रीतीने साध्य व साधन दोन्हीहि भ्रान्त असून राजवाडे आपल्या हातचलाखीने त्यांचें समर्थन करूं पहात आहेत.

१३ आणखी उदाहरण—आम्हां नेणतेयांचेया चित्तीं ( ज्ञा. ५।३ )—अर्थ—आम्ही जे अज्ञानी त्यांच्या चित्ताला. यांत आम्ही हा शब्द नेणते याशीं समानाधिकरण आहे. आम्ही कोण ? नेणते. आम्ही व नेणते एकच. नेणता या शब्दाचे षष्ठी—अनेकवचन नेणतेयांचें असें होतें. या षष्ठीचें विशेष्य चित्त आहे. चित्त प्रथमेंत नसल्याने पूर्वीचे षष्ठयन्तरूप विकृत झालें आहे. वर्तमान मराठींत विशेष्याच्या प्रथमान्य कोणत्याहि विभक्तीपूर्वी किंवा सामान्यरूपापूर्वी षष्ठयन्ताचें सामान्यरूप होतें; जसें—झाडाच्या सावलींत, सावलीने, सावलीबाहेर इत्यादि. ज्ञानेश्वर-मराठींत विशेष्याच्या तृतीयेपूर्वी षष्ठयन्ताची तृतीया होते; व ( प्रथमा वर्ज ) इतर विभक्तींपूर्वी षष्ठयन्ताचें सामान्यरूप होतें; जसें—नेणतेयांचेनि चित्तें ( तृतीया ) नेणतेयांचेया चित्तीं ( सप्तमी ), नेणतेयांचेया चित्तौन ( पंचमी ). सप्तमीच्या पूर्वी नेणतेयांचां असें अनुस्वारान्त सप्तम्यन्त रूपहि आढळतें. अशा रीतीने षष्ठयन्त ( विशेषण ) तृतीयेपूर्वी तृतीयान्त बनते, सप्तमीपूर्वी सप्तम्यन्त किंवा सामान्यरूप बनतें व (प्रथमान्य) इतर विभक्तींपूर्वी केवळ सामान्यरूप होतें. असा बदल षष्ठीच्या रूपांत झाला तरी षष्ठीच्या पूर्वींचें समानाधिकरण सर्वनाम नित्य सामान्यरूपच धारण करितें. आम्हां नेणतेयांचे चित्त, नेणतेयांचेनि चित्तें, नेणतेयांचेया किंवा नेणतेयांचां चित्तीं नेणतेयांचेया चित्तौन इत्यादि. येथे चित्त—ची विभक्ती कोणतीहि असली तरी, आम्हां हें सामान्यरूप कायमच आहे. तें सामान्यरूप पुढील षष्ठीमुळेंच झालें आहे; व त्यावर षष्ठीच्या विशेष्याच्या रूपाचा परिणाम मुळींच झाला नाही. यामुळें षष्ठीविशेष्याची तृतीया आहे म्हणून, पूर्वीच्या समानाधिकरण सव्ययाचीहि तृतीया मानणें तर्कदोष आहे. शिवाय येथे आम्ही हा शब्द चित्तशीं समानाधिकरण नसल्याने, आम्हां हें

चित्ताशीं समानविभक्तिक मानणें प्राप्तहि होत नाही. सारांश—सर्वनाम, समानाधिकरण शब्दाची षष्ठी, विशेष्य—अशीं शब्दत्रयी यथाक्रम असल्यास, त्यांतील विशेष्याच्या विभक्तीची छाया जवळच्या षष्ठीवर पडेल, षष्ठीने अंतरित असलेल्या सर्वनामावर मुळींच पडणार नाही, हें लक्षणीय आहे. यावरून 'मज ईश्वराचेनि लोभें' यांतील मज हें रूप, लोभें तृतीया म्हणून, तृतीया सिद्ध होत नाही.

**१४ गुणनिरूपण**—येथपर्यंत राजवाडयांच्या निरूपणांतील कांही ठळक ठळक दोष दाखविले. आता कांही गुणांचा उल्लेख करितों. **शिजणें** हा धातु सिध्–सिध्यति ( ५२ ) यावरून व्युत्पादिला आहे, तें योग्य आहे. या दोहोंमधील दुवा म्हणून साजणारें रूप ( To seethe ) सीद् हें इंग्रजी भाषेंत तुल्यार्थक आढळतेंच. **क्रमणं**—करमणें ( ४८ ) हीहि व्युत्पत्ति निर्दोष आहे. **रक्षितव्य** या ( Potential ) वैध उपाख्यातांतील **तव्य**—वरून मराठींतील **वें** हा प्रत्यय आला आहे. जावें, द्यावें, बोलावें पहावें, इत्यादि रूपांत हाच प्रत्यय आढळतो. पान २७ मध्यें गन्तास्मि हें क्रियापद संयुक्त कां मानितां येत नाही ? तें शुद्ध क्रियापद कां मानावें ? एतत्संबंधी प्रतिपादन तर्कशुद्ध आहे. व्याकरणांत विचार्य रूपाची सीमा कोणती ?–एतद्विषयक पुढील विधानहि व्याकरणकारांनी मार्गदर्शक म्हणून स्वीकरणीय आहे. 'शब्दप्रयोगाचें पृथक्करण करून फोड करितां करितां लिंगवचन विभक्त्यादि विकार ज्यापलीकडे दिसतनासे होतात तें रूप व्याकार्य रूपाची सीमा म्हणून स्वीकारावें' ( २९ ).

**१५ निगमन**—येथपर्यंत आपण काय पाहिलें ? प्रतिपक्षावर असमर्थित दोषांचा तुच्छतादर्शक भाषेंत आरोप, स्वमतसिद्ध्यर्थ भाषेंतील वर्तमानकालीन प्रयोगांचीहि ओढाताण, व्युत्पादनांत उच्छृंखलपणा, भलत्याच मराठींतील रूपाची भलत्याच संस्कृत रूपाशीं सांगड, मराठीच्या ( Parsing=) पदसंमर्शनांत दडपेपणा, तर्कशुद्धीस खो, लाक्षणिक अर्थाकडे डोळेझांक, उथळ हातचलाखी व तर्कप्रसादाचे कांही मूल्यवान कण राजवाडे यांच्या लेखांत आढळतात. शेवटीं त्यांची हातचलाखी पुढील उदाहरणाने स्पष्ट करून दाखवितों. 'मज ईश्वराचेनि लोभें' ( = मी जो ईश्वर त्याच्या प्रेमाने )–येथे ( १ ) मज हें ईश्वर या पोट प्रातिपदिकाच्या षष्ठीपूर्वीचें सामान्यरूप आहे; तरी पण राजवाडे त्यास विभक्ति मानतात. ( २ ) त्यास विभक्ति मानिलें तरी तें कदाचित् **ईश्वराचा** या रूपाशीं समानविभक्तिक म्हणून षष्ठ्यंत होईल; पण राजवाडे त्यास ईश्वराचेनि किंवा लोभें याशीं समानविभक्तिक कल्पून, त्यास तृतीया मानितात. ( ३ ) मज ही चुकीने तृतीया मानून, मज–बरोबर मला हेंहि रूप ते तृतीयाच ठरवितात. ( ४ ) मला तृतीया मानून 'मला शोभतें' यांतील शोभ हा अकर्मक धातु सकर्मक मानितात. ( ५ ) शोभ सकर्मक मानून शोभतें हा वर्तमानकाळीं कर्मणि प्रयोग मानितात. एवंच काय ठरवूं पाहतात ! हें की, 'मला **शोभतें**' हा **कर्मणिप्रयोग** आहे. परंतु हे येथील प्रमादपंचक—पाहिलें म्हणजे

त्यावर अधिष्ठित केलेल्या प्रमेयाची तर्कशुद्धता शशशृंगवत् अविद्यमान ठरून पुढील पद्याचें स्मरण होतें; तें पद्य उदाहरून आपला निरोप घेतों.

एष वन्ध्यासुतो पाति शशशृङ्गधनुर्धरः ।
मृगतृष्णाम्भसि स्नातः खपुष्पकृतशेखरः ॥

न्यू इंग्लिश स्कूल, पुणें
१३-१-३४.

गोविंद कृष्ण मोडक,
संस्कृत शिक्षक.

---

# रद्दींतील रत्नें

रत्न ३ शोधक—संपादक

## मुलींच्या शाळेची वार्षिक परीक्षा

ज्ञानोदय, २–५–१८५३

गेल्या महिन्याच्या २१ वे तारखेस कापावर एल्फिन्स्तन विद्यालयांतील ज्ञान-प्रसारक मंडळीच्या शाळांची वार्षिक परीक्षा झाली. त्यावेळेस तेथें पुष्कळ लोक जमले होते, व मुख्यस्थानीं नामदार लीकसाहेब बसले होते. तेव्हां पार्शी मुली व हिंदु मुली सुमारें चार पांचशें होत्या; त्यांतून कित्येकांची परीक्षा झाल्यावर पुस्तकें बक्षीस दिल्हीं व एवढी मुलींची संख्या शाळेंत येते असें पाहून फार आनंद वाटला. या सुंदर कामाकडे पार्शी लोक फार मेहनत घेतात व तेच या मंडळीच्या शाळेकडे बरेच रुपये देतात, व आपल्या मुलीही पाठवितात. आणि याशिवाय जमशेटजीच्या शाळेमध्यें मुली ३०० शिकतात. हल्लीं मुंबई बेटांत सुमारें दोन हजार मुली अभ्यास करितात, ही मोठी हर्षकारक गोष्ट आहे. थोड्या वर्षांमागें शाळेंत जाऊन अभ्यास करणारी मुलगी महाराष्ट्रांत व गुजराथ्यांत एकहि नव्हती. आणि जेव्हां मिशनेरी लोक हें काम चालवूं लागले तेव्हां त्यांस बहुधा सर्व लोक प्रतिकूलच होते. आणि इतक्यांतच किती फेरफार पडला हें पाहा; व पुढेंहि किती जलद फेर पडेल याचा रंग साफ दिसतो. आणि सुज्ञाहीं हें पाहून आनंद करावा व त्या कामास मदतही करावी हें योग्य आहे.

---

# व्युत्पत्ति, सूचना वगैरे

**आखाडसासरा**:—नव्या नवरीने आषाढ महिन्यांत सासरीं राहूं नये असें धर्मशास्त्र सांगतें. तेव्हा सासरहून आषाढांत ती माहेरीं येते, व सदढ्या सासऱ्याची बोलणीं खाण्याचें तेवढा काळ चुकतें. पण जेव्हा माहेरचाच एखादा पुरुष अनधिकाराने व वेळीं अवेळीं तिला बोलूं लागतो तेव्हा त्यास आखाडसासरा हें नांव बायका देतात.

शिष्ट संस्कृताचे कित्येक अपभ्रंश अडाणी लोकांच्या किंवा प्रांतिक शिष्ट बोलींत आढळतात; अशीं कांहीं उदाहरणें—

**पावूत**– म्हणजे पुष्कळ– हा शब्द संस्कृत प्रभूत शब्दाचा अपभ्रंश. कोकणांत अशिक्षितांचे तोंडीं विशेष आहे.

**पर्णिली**:—म्हणजे विवाह केला. हा शब्द संस्कृत परि + नी म्हणजे लग्न करणें यापासून अपभ्रष्ट झालेला खानदेशी अशिक्षितांत रूढ आहे.

**वायू**:—सुशिक्षितांचे व्यवहारांत वात व वारा हे शब्द फार आहेत. पण वायु हा तितकासा नाही. वायु याचें वाय् हें रूप कोंकणांत दर्यावरील लोकांच्या तोंडीं आहे. जोराचा वारा आला की ते वाय् आला, वाय् आला असें म्हणतात.

**कोळें**:—बैलाच्या पाठीवर जो मांसपिंड असतो त्यास देशावर खान्दा किंवा वशिंड ( सं० वृषस्कन्ध ) असें म्हणतात. कोकणांत त्यास 'कोळें' म्हणतात. मोल्स्वर्थ कोहळें ( कोहळ्याच्या आकाराचें ) असें रूप देतो. कै० आपटे हे 'कोळें' हें रूप देतात पण व्युत्पत्ति देत नाहीत. 'कोळें' हा शब्द संस्कृत ककुद् या शब्दापासून ककुद्–कउड्–कउळ्–कोळ–कोळें असा झालेला दिसतो.

**वंजन**:—संस्कृत व्यञ्जन शब्दाचा हा अपभ्रंश बायकांचे तोंडीं असतो. 'अन्नेन व्यञ्जनम्;' जसें दहींभातांत दहीं हें 'व्यञ्जन.' भाजींत हरभऱ्याची किंवा मुगाची डाळ वगैरे जे पदार्थ घालतात त्यांस वंजन म्हणतात.

**विंधणा–णें**– विंझणें संस्कृत व्यधू धातूपासून अपभ्रंशाने आलेला हा शब्द कोंकणांत पटाशी या अर्थी आहे.

**वाकस**:—वास्या–वायस–वाजस–वागस–वाकस ह्या देशावरील शब्दाऐवजीं कोकणांत 'तासणी' हा तक्ष् धातूपासून झालेला शब्द वापरतात.

**विंझणा**:—( सं० व्यंजन ) हा पंखा या अर्थी कोकणांत; विशेषतः जुन्या लोकांच्या तोंडीं असतो.

**दाण्डा**:—दण्डाप्रमाणे असलेला पदार्थाचा हातांत धरावयाचा भाग. पण हा शब्द कोकणांत नारळी– पोफळींच्या बागांतून पाणी खेळविण्याकरितां जे लहान मोठे

पाट असतात त्यांसहि लावतात. दण्डासारखा सरळ म्हणून दाण्डा. दाण्डे हे अर्थात वाकडे तिकडेहि असूं शकतात.

**निम्मेः**--( निम् ) म्हणजे अर्धे हा शब्द 'नेम' शब्दापासून आलेला आहे. नेम म्हणजे अर्धा हा शब्द 'प्रथमचरमतयाल्पार्धकतिपयनेमाश्च' या पाणिनी-सूत्रांत आला आहे. हा वैदिक वाङ्मयांत आहे. लौकिक संस्कृतांत आढळत नाही. 'प्रनेमस्मिन् ददृशे सोमो अन्तः' ( बालमनोरमेंत उद्धृत केलेली ) या ऋचेंत तो प्रपूर्वक आला आहे. नेम, पिक ( कोकिळ ) तामरस ( कमळ ) हे **शब्द वैदिक असले तरी ते मूळचे म्लेच्छ शब्द आहेत असा सिद्धान्त** मीमांसकांनी जैमिनी-सूत्रांच्या १।२।६ या अधिकरणांत केलेला आहे तो महत्त्वाचा व कौतुकावह आहे. मराठी एकदम वैदिक संस्कृतापासून आली आहे. कांही अंशीं तरी— याला उपोद्बलक असा हा नेम शब्द आहे.

## परिस्थितीवरून झालेले खेळ

कोकणांत नारळी पोफळीच्या बागा व मांडव घालण्याची पद्धत फार असल्यां-मुळे पुढील दोन साधे खेळ मुलें खेळतात.

**१ रांबीचा खेळः**—पाणी लावावें न लागणाऱ्या अशा एका माडाच्या म्हणजे नारळीच्या झाडाच्या बुंधाशीं किंवा मांडवाच्या ( शक्य तर ) एखाद्या मेढीच्या म्हणजे खांबाच्या बुंधाशीं नारळाचीं चोडें ( नारळावरून सोललेलीं जाड सालें ) सर्व बाजूंनी रास करून ठेवावयाचीं. त्यांतच उंदीरखादे झाडावरून कोंवळे पडलेले व सुकून केवळ जाळण्यास उपयोगी असे 'खोकटे' टाकावयाचे. एक चार हात दोरी, एक टोंक हातांत धरून माडाभोंवतीं गरगर फिरतां येईल अशी, दुसऱ्या टोंकास फासकी करून बांधावयाची. १०।१२ गडी ( म्हणजे खेळणारे ) खेळांत असतात. ते चकतात. ( चकणें म्हणजे काय हें नवीन पिढीस कदाचित् ठाऊकहि नसेल असो. ) चकण्यांत जो उजवत नाही त्यावर हार ( म्हणजे राज्य किंवा राज ) येतें. त्याने दोरीचें सुटें टोंक एका हातांत धरून दुसरा हात शक्य तितका लांब करून माडाभोंवतीं तीन फेऱ्या घातल्यावर, 'रांबी रे,' अशी आरोळी द्यावयाची. त्याबरो-बर योग्य अंतरावर झाडाभोवतीं उभे असलेल्या गड्यांनी तीं चोडें जवळ जाऊन लाथेने किंवा हातांनी दूर फेंकण्याचा प्रयत्न करावयाचा. हार घेतलेला गडी ती राख-ण्याचा प्रयत्न करतो. चोडांजवळ येणाऱ्या गड्यास तो शिवला तर त्या गड्यावर हार येते व पुन्हा खेळ सुरू होतो. चोडें थोडीं राहतात तेव्हा चपळाईचा व लक्ष ठेव-ण्याचा प्रश्न येतो. कोणत्याहि गड्यास न शिवतां जर सर्व चोडें काढलीं गेलीं तर हार असलेल्या गड्यावर एक कोंड झाला, असें म्हणतात; व अशा लागोपाठ तीन कोंडाचा एक मिठाचा खडा होतो. अर्थात् मिठाचा खडा क्वचित् होणार. हा खेळ मुलगेच खेळतात. घरांतील किंवा देवळांतील खांबाच्या बुंधाशीं कपडे ठेवूनहि हा खेळ खेळतां येतो; पण कपड्यांचे हाल !

रांबी हा शब्द चोर्डाभोवतीं रमणें किंवा ती न जाऊं देण्यासाठी राबणें यावरून झालेला दिसतो. आट्यापाटयांच्या खेळांत पाटी खेळून जाण्याच्या प्रयत्नास रांबणें असेंहि म्हणतात.

२ **लक्षुंवाईचा खेळः**—हा खेळ विशेषतः मुलींचा आहे. मुलगेहि खेळतात. लहान मुलगे व मुली एकत्रहि खेळतात. आठ दहा मुलें जमून चकतात. जी उजवत नाही तीवर हार येते. खेळणाऱ्या मुली मांडवाच्या एकेका खांबास धरून एकेक अशा उभ्या राहतात. हार घेतलेली मुलगी मांडवांत इकडून तिकडे सारखी हिंडत राहते. तोंडाने ' लक्षुंवाई ( लक्ष्मीवाई ) ताक दे, डेरा फुटला मडकं दे ' एवढें गाण्याचें कडवें सारखें वडबडत असते व आळीपीळीन एकएक हात तोंडाजवळ आणून दुसऱ्या हाताच्या तळव्याने पहिल्या हाताच्या कोपरावर थप्पड मारीत असते. ह्या थपडा वरील गाण्याचा ठेकाच होतात. त्याच वेळेस इतर मुली आपआपल्या खांबांची अदलाबदल करण्याचा प्रयत्न करतात. अर्थात् हार घेतलेली मुलगी, इतर मुली एका खांबापासून दुसऱ्या खांबाकडे पळत असतां, रिकामा राहिलेला खांब पटकावण्याचा प्रयत्न करते. खांबाच्या संख्येपेक्षा मुलींची संख्या एकाने जास्त असल्यामुळे खांब बदलण्याच्या झटापटींत एक मुलगी नेहमी रिकामी राहणारच. तिच्यावर हार येते. अशा तऱ्हेने पुरेसे वाटेपर्यंत खेळतात. या खेळाने बेतवार व्यायाम ( पळण्याचा ), झटापटींने होणारी करमणूक व मोकळींमध्ये खेळल्यास मोकळी हवा एवढयांचा लाभ होतो.

वरील दोनहि खेळांत पक्ष नसल्यामुळे चुरशीमुळे होणारे मत्सर, अवास्तव हेवा वगैरे दुर्गुण उत्पन्न होत नाहीत. बेतवार व्यायाम, करमणूक होऊन खर्चहि लागत नाही. बालवीरांच्या साध्यासुध्या खेळांत हे सामील करतां येतील.

विष्णु हरि निजसुरे

---

# रद्दींतील रत्नें.

रत्न ४ शोधक—संपादक

## धारचे राजे.

ज्ञानोदय, १–७–५३

धारचे पवार महाराजांस गेले गुरुवारीं नेक नामदार गवरनर साहेब बाहादूर हे दापोडीस भेटले; तेव्हां त्यांचा मोठा सन्मान केला. तो असा कीं, शहरचे गृहस्थ ह्यांस बोलावून नेलें होतें, तसेच कित्तीएक साहेब लोकहि होते. महाराजांच्या स्वारीबरोबर मेहेरवानं लिजिटसाहेब एजंट हे गेले होते.

---

# सूत उवाच– गोव्यांची 'सूतसंहिता' रचणारा 'सूत' कोण ?

[ पृच्छक: — रा. ब. वासुदेव अनंत बांवडेकर, नासिक रोड. ]

जिज्ञासेने खालील पुस्तकें आम्हीं वाचून पाहिलीं. [ १ ] दणाईत आणि वागळे या नांवाच्या गृहस्थांनी लिहिलेला 'गोमांतकाचा प्राचीन आणि अर्वाचीन इतिहास' इ. स. १८७३; [ २ ] Historical and Archaeological sketch of the city of Goa, preceded by a short statistical Account of the Territory of Goa. By Jose Nicolan Da Fouseca ( 1878 ); [ ३ ] गोमान्तक–शुद्धीचा इतिहास. ले. शंकर धोंडो क्षीरसागर [ १९३० ]; [ ४ ] महाराष्ट्र सांवत्सरिक, पुणें.

१. रा. दणाईत यांनी पृ. ३ वर 'मांडवी ऊर्फ **गोवानदी**' ह्यावर दिलेल्या टीपेंत दिलेले श्लोक:—- "काशी भीमरथी गंगा गोदावरी यथा नदी ॥ तथा **कुक्कोण**-**देशे** तु गोवापुर्या महानदी ॥ १ ॥ तत्र नद्यां महाबुद्धिर्यः सकृत्स्नानमाचरेत् ॥ एकविंशत्कुलं तेन तारितं तु न संशयः ॥ २ ॥ **सूतसंहिता**. [ अध्याय सांगितलेला नाही ]; तसेंच पृष्ठ १३ वर गोवापुरीसारखें दुसरें पुण्यक्षेत्र नाही, त्यासंबंधीं दिलेले श्लोक असे:– "गोकर्णादुत्तरे भागे सप्तयोजनविस्तृतं ॥ तत्र **गोवापुरी** नाम नगरी पापनाशिनी ॥ १ ॥ **गोवापुर्या** दर्शनेन पापं हन्ति पुरार्जितं ॥ यथा खेदर्शनेन तमो याति विशीर्णताम् ॥ २ ॥ **गोवापुर्या** द्विजेन्द्रेश स्नानार्थे मानसं यदि ॥ करोति यः सकृन्मर्त्यो सम्प्राप्नोति परं पदं ॥ ३ ॥ **गोवापुर्यासमानं** च नास्ति क्षेत्रं न संशयः ॥ तत्र संत्यग्रजन्मानो वेदवेदांगपारगाः ॥ ४ ॥ मंत्रौषधितपोयोगबलेन जितमन्यवः ॥ यस्मिन्वसन्ति विप्राश्च षट्कर्मनिरताः सदा ॥ ५ ॥" **सूतसंहिता** अध्याय १६. पुढे **पृ. ३८** 'कोंकणे' या नांवाच्या व्युत्पत्तीवर टीप देतांना दिलेला:– **कुक्कोण**देशगा यस्मात्कोंकणा नामतोऽभवन्" **सूतसंहिता** ( अध्याय सांगितलेला नाही ). याप्रमाणे श्लोक आधारार्थ छापले आहेत.

उपरोक्त पृष्ठ ३ आणि ३८ वरील अवतरणें संहितेच्या कोणत्या अध्यायांतून घेतलीं हें सांगितलेलें नाही; परंतु फक्त पृ. १३ वरील अवतरणाला १६ व्या अध्यायाचा आधार दिला आहे. तर एकाच ठिकाणीं अध्यायाचा आधार कां ? बाकी दोन ठिकाणीं कां नाही ? असा प्रश्न आहे.

२ गोमांतक शुद्धीचा इतिहास या ग्रंथांत पृष्ठ ९५ वर 'गोकर्णादुत्तरेभागे' इत्यादि अवतरण दिलें आहे; पण तें 'सह्याद्रिखंडांतलें' म्हणून सांगितलें आहे ! !

३ मि. फॉन्सिकांनी आपल्या इतिहासांत पृ. ११९ वर 'गोकर्णादुचरे भागे' हे ५ श्लोक ' सूतसंहिता, अ. १६ मधील ' म्हणून दिले आहेत. तेव्हा यावर असा तर्क संभवतो की, रा. दणाइतांचा इतिहास इ. स. १८७३ साली प्रसिद्ध झाला होता, त्यानंतर पांच वर्षांनी फॉन्सिकांचा इतिहास प्रसिद्ध झाला; तेव्हा एकाच प्रान्ताच्या इतिहासावर एकाच प्रान्तांतले हे दोन लेखक लिहिणारे असल्यामुळे, १८७८ साली लिहिणाराने १८७३ साली लिहिल्या गेलेल्या पुस्तकांतील अवतरण आपल्या त्याच विषयावरील प्रतिपादनास आधारभूत म्हणून घेणें शक्य आहे.

फॉन्सिकांना संस्कृत भाषेचें ज्ञान होतें किंवा नव्हतें हें समजत नाही; परंतु तें नसल्यास, रा. दणाइतांनी सूतसंहितेंतले म्हणून हे श्लोक त्यांना पुरविणें शक्य आहे. रा. क्षीरसागर यांनी १९३० साली तेंच अवतरण देऊन ' सह्याद्रिखंडांतलें ' म्हणून सांगितलें; परंतु कोणत्या अध्यायांतलें तें मात्र सांगितलेलें नाही. सध्या जे. जर्सन डॉ कुन्हा यांनी इ. स. १८७७ साली प्रसिद्ध केलेली सह्याद्रिखंडाची एक प्रत उपलब्ध आहे. ती चाळून पाहतां तींत हें अवतरण आढळत नाही. तेव्हा रा. क्षीरसागर यांनी तें दुसऱ्या कोणत्या प्रतींतून घेतलें हें प्रसिद्ध केल्यास फार आभारी होऊं.

डॉ कुन्हांच्या सह्याद्रिखंडाच्या प्रतीला मागाहून पुरवणीवजा मांगीशादि माहात्म्यें जोडली आहेत. त्यांच्या ९ व्या अध्यायांत शंखावली [ सांखवाळ गांवाला दिलेलें नांव ] नांवाच्या पवित्र तीर्थाच्या वर्णनांतील ७ वा श्लोक आणि दणाइतांच्या सूतसंहितेच्या १६ व्या अध्यायांतील उपरोक्त ४ था आणि ५ वा श्लोकार्ध यांत फक्त दोन शब्दांच्या फरकाशिवाय पूर्णपणें साम्यता दिसून येते. तो ७ वा श्लोक असाः—

यत्र सन्त्यग्रजन्मानो वेदवेदांगपारगाः । मन्त्रौषधितपोयोगबलेन जितमृत्यवः ॥ ७ ॥ [ पृ. ५६१ ].

सूतसंहिता या नांवाचा एक सटीक ग्रंथ पुणें येथील आनंदाश्रमाने ३८ वर्षांपूर्वी छापलेला असून त्यावर माधवाचार्यांची ' तात्पर्यदीपिका ' नांवाची टीका आहे. सूतसंहिता म्हणतात ती ही एकच, दुसरी या नांवाची संहिता नाही असें समजतें. ह्या सूतसंहिता ग्रंथांत दणाईत आणि फ्रान्सिका यांनी दिलेल्या गोव्याच्या माहितीच्या श्लोकांचा कोठे मागमूसहि लागत नाही ! शिवाय गोव्याची महती वर्णन करण्याचा आणि कोंकणे या नांवाची व्युत्पत्ति सांगण्याचा विषय तींत येण्याचा प्रसंगहि नाही. करिता सत्यनिर्णयासाठी सदर सूतसंहिता कोणती याबद्दल सविस्तर माहिती प्रसिद्ध करावी. त्याने गोव्यांच्या खऱ्या इतिहासास मदत होणार आहे; व त्यासाठीच आमची वरील पृच्छा आहे. रा. क्षीरसागर यांनी आपला आधार अवश्य प्रसिद्ध करावा, अशी त्यांना विनंती करितों.



अनुक्रमणिका

गोव्यें प्रांतांत 'माधवाचार्य' यांच्या नांवाचें फार बंड असल्याचें समजतें. अलीकडे मद्रास, म्हैसूर यांकडील कांही विद्वान संशोधकांनी विद्यारण्य [ ह्यांचें पूर्वाश्रमींचें नांव माधव होतें म्हणून कैक लेखकांनी त्यांचा उल्लेख 'माधवारण्य' असा केला आहे. ] आणि दुसरे जे दोन तीन 'माधव' इतिहासांत आढळतात ते निराळे होते, हें दाखविलें आहे. आम्हीहि ६।७ वर्षांपूर्वी कारणपरत्वें एक दोन लेखांत अनेक प्रमाणांसहित तेंच दाखविलें होतें. उपरोक्त तात्पर्यदीपिकेचा लेखक 'माधवाचार्य' हा विजयनगरच्या इतिहासांत पहिल्या बुक्करायापासून तों दुसऱ्या हरिहररायापर्यंत विशेषतः 'माधवमंत्री' या नांवाने सुप्रसिद्ध आहे.

---

# रद्दीतील रत्नें

रत्न ५ शोधक—संपादक

## पुण्यांतील पाठशाळा व विद्यावृद्धि

ज्ञानोदय, २–५–५३

.........सर्वांनीं विद्या करून सुज्ञ व अनुदार व्हावें असी सरकारची इच्छा आहे. हल्लीं याविषयीं ज्ञानप्रकाश पत्रांतून येणेप्रमाणें उतरून घेतों तें पाहावें म्हणजे सन १८५३ वर्षांत पुण्यांतील ब्राह्मणांनीं कसें अज्ञान चालविलें आहे तें ध्यानांत येईल:—

वाडा विश्रामबाग एथील पाठशाळेंत राजश्री नारायणशास्त्री अभ्यंकर व गोपाळशास्त्री गोखले ह्यानी सरकारापासीं सर्व जातीच्या मुलांस संस्कृत शिकविण्याचें कबूल केलें. तारीख १ माहे मजकुरापासून शिकवूं लागले. आम्ही त्या दिवसीं मुद्दाम विश्रामबागेंत जाऊन पाहिलें तों वर लिहिलेले शास्त्रीबुवा, स्वधर्माचा आणि स्वजातीचा अभिमान सोडून फक्त आपलें पोट भरण्यावरच नजर देऊन, सोनार, शिंपी, परभु, फारसी, शूद्र इत्यादि जातींच्या मुलांस पुढें घेऊन संस्कृत कौमुदींतील नियम त्यांस सांगत होते. हर ! हर हर ! हर ! हें दुष्ट कर्म पाहून आमचे मनास तर फारच विस्मय झाला. बरें असो, हें विलक्षण कृत्य ह्या उभयतां शास्त्र्यांनीं चालविलें हें गांवभर झालें आहे. भट्ट व शास्त्री वगैरे लोकांचीं मनें अगदीं खवळून गेलीं आहेत.

आम्हीं असें ऐकतों कीं एथील शुक्लपक्षांकडील अग्रेसर भट व शास्त्री यांनीं सभा भरून हरदू [ सदरहू ? ] शास्त्र्यांस बहिष्कार घातला आतां पुण्यांतील मुख्य मुख्य भट व गुंडेशास्त्री यांचा रोजगार पिकला. ह्या प्रामण्यप्रकरणीं आम्ही आमच्या वाचणाऱ्याकरितां पुढें लिहून कळवूं.

सदरहु ज्ञानप्रकाशकर्त्यांचा लेख पाहून आम्हांस आश्चर्य वाटतें; पोटभरू अज्ञानी भटलोक गडबड करितात त्यांचें आश्चर्य वाटतें असें नाहीं; तर **ज्ञानप्रकाश** असें नांव आपणास ठेवून विद्या सर्वांनीं सारखीच शिकूं नये असा पक्ष धरितो ! तर त्याने ते नांव फिरवून **अज्ञानांधार** असें नांव ठेवावें म्हणजे नांव आणि कृति यांची ऐक्यता होईल.

# परीक्षण

## मराठी भाषा उद्गम व विकास

यद्यपि बहुनाधीषे तथापि पठ पुत्र व्याकरणम्।
स्वजनः श्वजनो मा भूत् सकलं शकलं सकृच्छकृत् ॥

मराठी भाषेचा उदयकाल जर कधी यावयाचा असेल तर तो प्रेमविषयक काव्यग्रंथांनी न येतां शास्त्रविषयक ग्रंथांनीच होईल, हें ज्यांना पटेल त्यांना श्री. कृ. पां. कुलकर्णी यांनी लिहिलेल्या 'मराठी भाषा उद्गम व विकास' या पुस्तकाचें निराळें वर्णन करण्याचें कारण उरणार नाही. भाषाशास्त्रावर मराठींत राजारामशास्त्री भागवत व विश्वनाथ काशीनाथ राजवाडे हे अपवाद खेरीजकरून कोणी लिहिलें असल्याचें आम्हांस माहीत नाही. मराठींत नामांकित ग्रंथकार अनेक निर्माण होत आहेत यांत संशय नाही; परंतु ग्रंथकार भाषाशास्त्रज्ञ असतोच असें मानणें चुकीचें होईल. चटकदार व चुरचुरीत लिहिण्याला भाषाशास्त्राच्या ज्ञानाची अवश्यकता नसते. खराखुरा विद्यार्थीच असल्या क्लिष्ट विषयांत मन घालूं शकेल. व्याकरणशास्त्र हा अत्यंत क्लिष्ट विषय म्हणून सामान्य समजूत आहे; परंतु आमच्या मतें काव्याहूनहि अधिक मनोरंजक असा हा विषय आहे असें मानण्यास हरकत नाही.

श्री. कुलकर्णी यांनी या जवळजवळ ४०० पानांच्या पुस्तकांत मराठी भाषेसंबंधाने निरनिराळ्या भाषांतून विखुरलेलें लिखाण संकलित केलें असून त्यांत आपल्या स्वतःच्या अभ्यासाचीहि भर घातली आहे.

मराठी भाषेविषयी लिहिणाराला मराठीची पूर्वपीठिका, तिची उत्पत्ति, तिचे कालपरत्वें व प्रांतपरत्वें भेद, तिची वर्णप्रक्रिया व शेवटीं तिचें व्याकरण इतक्या विषयांवर लिहिणें अवश्य आहे.

श्री. कुलकर्णी यांनी त्याप्रमाणे केलें आहे; इतकेंच नव्हे तर उपरोक्त सहा विषयांखेरीज भाषाशास्त्राच्या सामान्य तत्त्वांचाहि ऊहापोह त्यांनी पहिल्या प्रकरणांत केला आहे. भाषाशास्त्राच्या सामान्य तत्त्वांचें आकलन झाल्याशिवाय कोणत्याहि भाषेंत सतत होत जाणारा बदल ह्याचें यथार्थ आकलन करतां येणार नाही.

श्री. चतर्जी यांनी बंगाली भाषेसंबंधाने असाच ग्रंथ लिहिलेला आहे व तो ग्रंथ पुढे ठेवूनच श्री. कुलकर्णी यांनी आपल्या ह्या प्रस्तुत पुस्तकाची रचना केली असावी. त्यांनी आपल्या पुस्तकाला नांवहि दिलेलें आहे तें रा. चतर्जी यांच्या पुस्तकावरूनच घेतलें आहे.

भाषाशास्त्रांत कोणताहि निरपवाद सिद्धांत स्थापन करणें अशक्यप्राय असलें तरीं एका संस्कृत कवीने म्हटल्याप्रमाणे ह्या शब्दशास्त्राचा अभ्यास न करतां सभेंत वक्तृत्व करणाऱ्या अथवा ह्या विषयावर ग्रंथ लिहिणाऱ्या माणसाची स्थिति कमलनालतंतूने मदोत्कट हत्तीला बद्ध करूं पाहणाऱ्या माणसासारखी असते. अशा विद्वानाला कोणत्याहि शब्दाची व्युत्पत्ति सिद्ध

करून दाखवितां येते. उदा०:—अवस्ता इति अवेजस्ता अवेज इति निर्मल इति श्रुतिः निर्मल श्रुति इत्यर्थः (नेरीओसेंगचें भाषांतर). असो.

कोणत्याहि भाषेचें उपादान कारण ध्वनि हेंच आहे; आणि सृष्टीमध्ये सर्व उपादान कारणें ज्याप्रमाणे ईश्वरदत्त आढळतात त्याप्रमाणे ध्वनि ही परमेश्वराचीच देणगी असल्यामुळे एका अर्थाने ईश्वरनिर्मित भाषा आहे असें म्हणतां आलें तरी मृत्तिकेचें जनकत्व ईश्वराकडे येत असूनहि घट करणारा कुंभारच आपण समजतों, घटाचें कर्तृत्व ईश्वराकडे देत नाही त्याप्रमाणे भाषा हें मनुष्याच्या बुद्धीचेंच कार्य असल्यामुळे मनुष्यालाच तिच्या कर्तृत्वाचें श्रेय देणें योग्य आहे. पृथ्वीच्या पाठीवर निरनिराळ्या ठिकाणीं मनुष्याची उत्पत्ति झाली असावी हें मत सध्या सर्वसंमत आहे. त्यामुळे निरनिराळ्या ठिकाणीं निरनिराळ्या भाषा, निरनिराळ्या काळीं अथवा एकाच काळीं निर्माण झाल्या असाव्या असें म्हणणें ओघासच येतें. तरी पण ह्या बाबतींत केवळ तर्काचाच अवलंब करावा लागतो ही गोष्ट प्रांजलपणें कबुल करणें भाग आहे. मनुष्य आणि भाषा यांचें साहचर्य होतें काय ? म्हणजे मनुष्य निर्माण होतांच तो भाषा बोलूं लागला काय ? अथवा भाषा निर्माण होण्यापूर्वी मानवप्राणी ह्या पृथ्वीवर किती काळ होता हें ठरविण्यास कोणतेंहि गमक नाही. फार काय, परंतु भाषेशिवाय मानवसमूह कांही काळ राहणें तरी शक्य आहे काय ? या प्रश्नाचेंहि निश्चयपूर्वक उत्तर देतां येत नाही. भाषेशिवाय मनुष्याचा व्यवहार चालणें अशक्य आहे. भाषा नसती तर मनुष्य आजच्या पायरीस चढलाहि नसता. मनुष्येतर–प्राणिमात्राची संस्कृति ज्याप्रमाणे नाही त्याप्रमाणे मानवी संस्कृति हा शब्दप्रयोगहि अस्तित्वांत आला नसता. या दृष्टीने भाषेचें महत्त्व फार आहे असेंच म्हणावें लागतें. आमच्या प्राचीन ऋषींनी भाषेची ही कामगिरी ओळखिली होती. वाक् अक्षरं प्रथमजा ऋतस्य । वेदानां माताऽमृतस्य नाभिः ॥ असा तैत्तिरीय ब्राह्मणांत उल्लेख आढळतो (२–८–८–५). ध्वनि हें भाषेचें उपादान कारण आहे (वाणी हा शब्द वन् = आवाज करणें ह्यापासून निघाला आहे) हें जर खरें असेल तर ध्वनि काढण्याचें सामर्थ्य ईश्वराने सर्व प्राण्यांना जरी नाही तरी पुष्कळ प्राण्यांना दिलें आहे यांत संशय नाही. एवढेंच नव्हे तर पोपटासारख्या कांही पक्षांना मनुष्यासारखे कांही शब्दहि बोलतां येतात ही सर्वांच्या अनुभवाची गोष्ट आहे. तसेंच पशु जे ध्वनि काढतात त्यांना संकेत किंवा अर्थ नसतो असेंहि म्हणतां येणार नाही. एका पशूने ध्वनि केला असतां दुसरा पशु हुंकार देतो. त्याचप्रमाणे कुत्र्याचें भुंकणें व रडणें ह्यांचे निरनिराळे ध्वनि असतात. परंतु या ध्वनींचा विस्तार मानवजातीनेच केला ही गोष्ट निःसंशय खरी आहे. मनुष्याच्या नानाविध व्यापारांकरता त्याला ध्वनिवैचित्र्य शोधून काढणें भाग पडलें. ध्वनींना संकेत किंवा अर्थ देणें हें अर्थात् एकाच व्यक्तीचें काम केव्हाही असूं शकणार नाही. परस्परांचे व्यवहार परस्परांस समजावे म्हणून परस्परांच्या गर्भित संमतीनेच हे संकेत रूढ झाले असावे. जगामध्ये मनुष्य एकटाच असता तर त्याला कदाचित् भाषेची अवश्यकता भासली नसती. आता ही गोष्ट खरी की, मनुष्याप्रमाणे पशुपक्षीहि असंख्य आहेत, परंतु त्यांनी भाषा निर्माण केली नाही. त्यांच्या मर्यादित व्यापारांत असंख्य ध्वनींची अथवा भाषेची जरूरी नाही हें उघड आहे. तेव्हा मनुष्य जो असंख्य चेष्टा करीत असतो तें त्याच्या बुद्धीमुळेच होय हें म्हणणें ओघानेच प्राप्त होतें. ही

मनुष्याची बुद्धि जर कांही कृत्रिम उपायांनी पशुपक्षांत घालतां आली तर तेहि मनुष्याप्रमाणेच भाषा निर्माण करतील. पण मग पशुपक्षी आणि मनुष्य यांत फरक तो काय राहणार ? या सर्व विवेचनाचा निष्कर्ष इतकाच की, ध्वनि जरी मनुष्य आणि पशुपक्षी यांना सामान्य असला तरी मनुष्यामध्ये बुद्धि ही अधिक असल्यामुळे भाषेची वाढ मनुष्यांत झाली.

मनुष्याने प्रथम कोणते शब्द तोंडांतून काढले व ते कां काढले ह्याविषयीं अनेकांच्या अनेक कल्पना आहेत. अगदी प्राथमिक मनुष्याचे व्यापार आजच्या माणसाइतके जरी असंख्य व गुंतागुंतीचे नसले तरी पशुपक्ष्यांहून ते अधिक असले पाहिजेत हें खास. विचार आणि विकार यांमध्ये विकाराचा उद्भव सहज असल्यामुळे प्रथमावस्थेतील मनुष्याचे व्यापार विकार-प्रेरितच असले पाहिजेत हें उघड आहे. म्हणून प्रेम, भीति इत्यादि मनोविकारांच्या योगाने त्याच्या तोंडांतून त्या त्या विकारांचें आविष्करण करणारे शब्द बाहेर सहज-रित्या पडणें असंभवनीय नाही. तसेंच, सभोंवतीच्या पशुपक्ष्यांच्या ध्वनींचें अनुकरणही मनुष्याने करणें स्वाभाविक आहे. तात्पर्य, मनुष्याच्या भाषेचें कारण, एकाच गोष्टींत आहे असें मानणें हटवादी-पणाचें होईल. 'योहियो' सिद्धांतांत कांही अर्थ आहे असें आम्हांस वाटत नाही. हा सिद्धांत न्वारे ह्याचा आहे असें जेसपर्सन म्हणतो. आमची अशी समजूत आहे कीं, मनुष्याला वागींद्रिय व बुद्धि ज्या अर्थी परमेश्वराने दिलीं आहेत त्या अर्थी तो बोलणारच. आपण जो उच्चार करतों अगर शब्द काढतों तो विचारपूर्वक असतो हें ध्यानांत ठेवलें तर मनुष्याला बुद्धीच्या योगें विचार करतां येऊं लागल्यामुळेच त्याने शब्दजाल निर्माण केलें असें म्हणावें लागतें. निर्हेतुक उच्चारण हें केवळ वेड्याच माणसाकडून होत असतें.

निरनिराळ्या काळीं निरनिराळ्या लोकांनी निरनिराळ्या भाषा उत्पन्न केल्यामुळे त्या भाषांत फरक दिसून येतात. मुळांत एक भाषा असतांना तिचा अफाट वंश वाढून पूर्वजाची ओळख वंशजांना न राहणें शक्य आहे. तथापि त्या सर्वच भाषा एका वंशांतल्या असल्यामुळे एकाच गोत्रांत अंतर्भूत होतात. पितृस्थानीं असलेल्या या निरनिराळ्या भाषा अभ्यासून त्यांमध्ये अधिक जुनाट कोणती हें अद्यापि निश्चितपणें ठरविलें गेलें नाही. हा विचार जरी क्षणभर बाजूस ठेवला तरी अगदी प्राचीन मनुष्य जे शब्द उच्चारूं लागला ते धातूरूप होते अगर नामरूप होते हेंहि खात्रीपूर्वक सांगण्यास कोणतेंहि साधन नाही. तथापि क्रिया चिन्हांनी अगर खुणांनी व्यक्त करतां येईल पण वस्तु येणार नाही हें ध्यानांत ठेवलें पाहिजे.

कोणत्याही भाषेचा इतिहास पाहिला असतां असें दिसून येईल की, पूर्वीची भाषा कालांतराने अगम्य होत जाते. याचा अर्थ असा की, भाषेंत सारखा फरक पडत असतो. भाषेचा मुख्यावयव जो वर्ण त्या वर्णोच्चारामध्ये व शब्दांच्या अर्थामध्येही बदल होत असतो. हे बदल होण्याचीं कारणें श्री. कुळकर्णी यांनी आपल्या पुस्तकांत विस्तृत रितीने वर्णिलीं आहेत. ग्रंथकाराच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे "शब्दाच्या स्वरूपांत बदल, अर्थांत बदल किंवा दोहोंत बदल, स्वरूप कायम राहून अर्थ बदलणें किंवा अर्थ तोच राहून स्वरूपांत बदल पडणें, जुने शब्द नाहींसे होणें; नवे शब्द येणें" हे सर्व प्रकार भाषेंत प्रत्यहीं चाललेले असतात. अशा रितीने भाषेंत होणारा बदल आपोआप होत असतो. ह्याला जरी आपण विकास हें नांव

खरा अर्थ नुसत्या शब्दांतून निघत नाही तर त्याच्या स्वरांतून निघतो. ह्या दृष्टीने 'मन्त्रो हीनः स्वरतो वर्णतो वा मिथ्या प्रयुक्तो न तमर्थमाह' हा नियम कोणत्याही भाषेसंबंधाने सनातन समजला जाईल. "स्वरतोऽर्थनिर्णयः" (ऋग्वेदानुक्रमणी). अर्वाचीन भाषांतून अर्थनिर्णायक विराम चिन्हें निर्माण झालीं आहेत. प्राचीनतम भाषांत निरनिराळीं चिन्हें वापरीत. प्रत्यक्ष वैदिक वाङ्मयांतहि चिन्हभेद आढळून येतात. सामवेदाच्या पोथींत उदात्त, स्वरित व अनुदात्त हे स्वर १, २, ३ ह्या आंकड्यांनी निर्दिष्ट केलेले असतात. उ. बर्हिषि. ऋग्वेदांत हेच स्वर बर्हिषि ह्या चिन्हांनी दाखवितात. अक्षराखाली अर्ध वर्तुळ काढून मैत्रायणी संहितेंत स्वतंत्र स्वरित व्यक्त करतात; उभ्या तीन रेषा ही परतंत्र स्वरिताची खूण आहे.

प्रत्येक शब्दांतील अक्षरांना आरोह, अवरोह असतोच. ह्यालाच उदात्त व अनुदात्त ह्या संज्ञा आहेत. उदात्तांत तोंडांतील श्वास वर जातो. उदात्त म्हणजे वर चढवलेला. गवत ह्या शब्दांत व हें अक्षर आरोह युक्त उचारलें जातें. परंतु गवताने ह्या शब्दाच्या उच्चारांत व मरगळला जातो. ह्यावरून अक्षरांच्या उच्चारभेदांचीं चिन्हें असणें किती अवश्य आहे तें समजेल. सर्वांत उदात्त स्वर मुख्य दिसतो. उदात्त म्हणजे स्वर. सामवेदांत उदात्ताला स्वरित म्हणतात. स्वरित म्हणजे स्वरयुक्त. शतपथ ब्राह्मणांत उदात्तालाच चिन्ह आहे. अक्षराच्या उच्चार भेदाप्रमाणे अर्थभेदामुळेहि स्वर बदलतात. उ. अपरम् (नंतर), अपरम् (दुसरा); द्रवत् (लवकर), द्रवत् (धांवत धांवत) तसेंच राजपुत्र (राजाचा मुलगा), राजपुत्र (ज्याचा मुलगा राजा आहे तो). बहुव्रीहि समासांत अन्त्यपद उदात्त असतें हा नियम खरा परंतु ऋग्वेदांतच त्याला अनेक अपवाद असलेले आढळतात. पादाच्या आरंभीं क्रियापद आल्यास तें सस्वर असतें; निपात, सर्वनाम, सदा अनुदात्त असतात. इ. नियमावरून अर्थ निश्चित करण्याच्या कामीं स्वरांचा उपयोग होतो असें मानणें भाग आहे. परंतु संहितेबरोबरच हे स्वर होते काय हा प्रश्न अद्यापि सुटला नाही. असो अधिक चर्चा करण्याचें हें स्थळ नसल्यामुळे प्रस्तुत प्रकरण ओलांडून पुढे जाणें बरें. शेवटलें अक्षर लांबट उच्चारणें, हेल काढून बोलणें, शब्दांतील एखाद्या अक्षरावर जोर देऊन तो शब्द उच्चारणें हे प्रकार अर्वाचीन अनेक भाषापोटभाषांतून आढळतात.

अखेरचें प्रकरण "मराठीचें व्याकरण" हें असून ह्या विषयावर जवळ जवळ साठ पृष्ठें खर्ची घातलीं आहेत. भाषेंत नाम व क्रियापद हे दोन शब्द वाक्याच्या दृष्टीने महत्त्वाचे असून विशेषणें, क्रियाविशेषणें वगैरे शब्द त्यांच्या अनुषंगाने असतात. वाक्यांतील नामाचा विचार करूं लागलों म्हणजे विभक्तींचा प्रश्न प्रथम पुढे येतो. शब्दाचे निरनिराळे कारक अर्थ ज्या चिन्हांच्या योगाने प्रतीत होतात त्यांना विभक्ति असें म्हणतात. हीं चिन्हें म्हणजे प्रत्यय होत. निरनिराळ्या भाषांत कमजास्त विभक्ति असतात. सात किंवा आठ विभक्तींहून अधिक विभक्तींची संख्या ऐकिवांत नाही. संबोधन सोडून संस्कृतांत सात विभक्ति आहेत. प्राकृतांत चतुर्थी विभक्ति नाही. मराठींत प्रथमा विभक्तीला प्रत्यय नाही. द्वितीया व चतुर्थी ह्या दोहोंचे प्रत्यय एकच आहेत. ह्यामुळे ह्या दोन विभक्त्या मानाव्या की मानूं नये? तसेंच एकच विभक्ति

मानल्यास ती द्वितीया अगर चतुर्थी मानावी ह्याविषयी मतभेद असलेला आढळतो. स, ला, तें हे द्वितीयेचे प्रत्यय समजतात; परंतु प्रत्यय न लागतांहि शब्दाची द्वितीया होऊं शकते. उदा.– मी काम करतों. ह्यांत " काम " ही प्रथमा की द्वितीया ? वरील वाक्यांत " काम " शब्दाचा कर्मकारक संबंध असल्याकारणाने द्वितीया मानावी असा निर्णय ग्रंथकारांनी दिला आहे. अप्रत्यय प्रथमा मानल्यावर अप्रत्यय द्वितीया मानणें कितपत सयुक्तिक होईल ह्याची आम्हांस शंका आहे. शिवाय एकाच विभक्तीचे भिन्नार्थ होतात. तेव्हा कारकभेदामुळे निराळी विभक्ति मानली पाहिजे हा युक्तिवाद जमेस धरतां येत नाही. तसेंच प्रथमेला प्रत्यय नाहीत; म्हणून वाक्यांत येतांना नामाला विकार झालाच पाहिजे असाहि आग्रह धरतां येत नाही. अधिकरणार्थी चतुर्थी होते तर कर्मार्थी प्रथमा कां होऊं नये समजत नाही. प्रत्ययांवरून विभक्ति निश्चित करणें आणि मग असेल तो अर्थ तिला देणें हेंच एकंदरींत प्रशस्त दिसतें. चतुर्थीचे "स" व " ना " प्रत्यय संस्कृतांतील षष्ठीच्या "स्य" व "ना" ह्यांवरून आले आणि त्यांचा अर्थ अधिकरण; म्हणजे खरें सप्तमीचें कार्य ! षष्ठीप्रमाणे चतुर्थी विभक्ति अनेक विभक्तींचें कार्य करते. ऋग्वेदांत षष्ठीबद्दल चतुर्थी वापरलेली आहे. उ. पुरुत्रा यदभवत्सूरहैभ्यो गर्भेभ्यो मघवा विश्वदर्शतः ( १–१४६–५ ). येथे गर्भेभ्यः ही पञ्चयर्थे चतुर्थी आहे. अर्वाचीन प्रत्यय हे मूलतः स्वतंत्र शब्द होते ह्या गोष्टीकडेहि विभक्तिसंख्यावादांत दुर्लक्ष केलें जातें असें वाटतें. द्वितीया-चतुर्थीप्रमाणे षष्ठी विभक्ति मानावी की नाही हाहि मोठा मनोरंजक वाद आहे. दोनहि बाजूंनी प्रमाणें देतां येतात. आमच्या मतें हा विशेषणात्मक विभक्तिस्वरूपी शब्दप्रयोग स्वतंत्र धरून त्याची व्यवस्था लावावी. च प्रत्यय लावतांना शब्दाचें सामान्य रूप सर्वत्र होत नाही तर इतर विभक्ति प्रत्यय लावतांना जेथे होतें तेथेच होतें. उदा.–घोडीने–घोडीचा; तसेंच च प्रत्यय लागला म्हणजे विशेषण बनतें असाहि नियम नाही. उदा.–तूं थंडीचा लवकर कां उठलास ? च प्रत्यय "ईय ह्या संस्कृतांतील तद्धित प्रत्ययापासून आला आहे असें आमचें मत आहे " असें ग्रंथकारांनी आपलें मत व्यक्त केलें आहे. ही व्युत्पत्ति प्रथम कृष्णशास्त्री चिपळोणकरांनी पुढे मांडली. दामल्यांना ही व्युत्पत्ति पसंत नाही. ते, डॉ. भांडारकर व राजवाडे संस्कृतांतील 'त्य' प्रत्ययावरून मराठी षष्ठीचा 'च' प्रत्यय बनवतात. च प्रमाणे स व ल हेहि षष्ठीचे प्रत्यय आहेत, परंतु हे प्रत्यय विशिष्ट शब्दांनाच लागतात. झ प्रत्यय मी व तूं ह्या सर्वनामांच्या षष्ठीच्या एकवचनी रूपांतच आढळतो. आपण ह्याला षष्ठीचा ल प्रत्यय लागतो. उ. आपला -ली-लें. परंतु आपण ह्यांतील ण ल प्रत्यय लागतांना नाहीसा होतो ह्याचा विचार केला पाहिजे. ' आप " ( आपण ) हाच मूळ शब्द घेऊन त्याची षष्ठी आपला अशी होत नसेल ना ?

जुन्या मराठींत प्रथमेचें एकवचन उ प्रत्ययांत होत असे तसें तें जुन्या गुजराथींतहि होत असे. तेथे उ अचा लोप न होतांना लागे. उ. निग्रहउ. "वचनु" सारखीं रूपें होत नसत असें नाही. मराठींत तृतीयेचा प्रत्यय ई आहे तर जुन्या गुजराथींत ई किंवा इ असे. उ. पुरुष + इ = पुरुषे = पुरुषाने. हाच प्रत्यय सप्तमीचा. उ. प्रदेश + इ = प्रदेशे = प्रदेशांत. ह्यानंतर सर्वनामांची व्युत्पत्ति दिल्यावर ग्रंथकार संख्यावाचक विशेषणांवर आले आहेत. एकदा, दोनदा, तीनदा वगैरे शब्दांतील दा प्रत्यय अवेस्तिक " दा " सारखा आहे. पहवी

भाषेंत दाद ह्या शब्दाचा अर्थ वेळ असा होतो. संस्कृतमध्ये नित्य ह्या अर्थाचाच नित्यदा असा शब्द आहे. उ. " असत्वेव नित्यदा तुभ्यं भक्तिर्मय्यनपायिनी " ( भागवत १०-५१-६३ ). अर्थात् "दा" हा प्रत्यय "दाद" शब्दाचें संक्षिप्त रूप असावें.

आज्ञार्थी ऊं प्रत्यय मराठीप्रमाणे प्राचीन गुजराथींतहि होता. उ. सोधऊं = शोधूं. सर्वभाषांतील जुने प्रत्यय तपासले असतां भाषांतील फेरफार समजण्यास चांगलें साधन होईल. ऊं प्रमाणें णार हा कृदतांचा प्रत्यय जुन्या गुजराथींत " णहार, " " णाहार, " ह्या स्वरूपांत आढळतो. उ. करणहार = करणार. हा "णार" किंवा "णृ" प्रत्यय नर अथवा नृ शब्दाचें विकृत रूप असावें. रक्षन् + नरः = रक्षणार. रक्षण + कार ही व्युत्पत्ति जुनी आहेच.

ऊं प्रत्ययांत कृदंताला विभक्ति लागत नाही असें दामले म्हणतात; परंतु 'नेसूंचें लुगडें' असा शब्दप्रयोग करण्याची वहिवाट आहे. ह्यांत 'नेसूं'चें व्याकरण काय करावयाचें ह्याचा विचार श्री. कुळकर्णी ह्यांनी केलेला दिसत नाही.

कर्मणि प्रयोगाची चर्चा दामल्यांनी पुष्कळ केली आहे. तिचाच अनुवाद श्री. कुळकर्णी ह्यांनी केलेला दिसतो. त्याने काम केलें, त्याच्याकडून काम केलें जातें वगैरे ह्या प्रयोगाचीं उदाहरणें म्हणून अनेकांप्रमाणे ग्रंथकारांनीहि दिलीं आहेत. दादोबा दुसऱ्या उदाहरणांतील वाक्यप्रयोगाला कर्मकर्तरि म्हणतात. वाक्यांतील कर्माप्रमाणे क्रियापदाचें लिंगवचन असतें हें कर्मणि प्रयोगाचें लक्षण त्याने काम केलें ह्यासारख्या वाक्यांनाच लागू पडेल. त्याच्याकडून काम केलें जातें ह्या वाक्यांत काम हा कर्ता असून केलें जातें हें क्रियापद आहे. अशा वाक्यांतील क्रियापद कर्त्याचें लिंगवचन घेतें. उ. त्याच्याकडून पोथी वाचली जाते, त्याच्याकडून मार दिला गेला इ० व्याख्येप्रमाणे हीं सर्व कर्तरिप्रयोगाचीं उदाहरणें नाहीत काय ? कर्तरींतील कर्म ह्या ठिकाणीं कर्तृस्थानापन्न होतें एवढेंच. आम्हांला ग्रंथकारांचें मत मान्य होत नाही. काम केलें जातें ह्यांत केलें ह्याचें 'काम' कर्म करून 'केलें' हा 'जातें' ह्या क्रियापदाचा कर्ता समजावा का?

वरील विवेचनावरून ह्या पुस्तकांत किती तरी महत्त्वाच्या गोष्टींचा ऊहापोह झाला आहे ह्याची कल्पना कोणासहि होईल. श्री. कुळकर्णी ह्यांनी भाषाशास्त्राचा ग्रंथ मराठींत बनविला आणि अभ्यासकांचा मार्ग सुलभ केला. परंतु अभ्यासूंची मात्र उणीव आहे. ही उणीव भरून निघेल अशी आशा करीत असावें. पुस्तकांत कितीहि दोष असले तरी त्यामुळे ग्रंथकाराच्या प्रयत्नाला किमपि कमीपणा येणार नाही. लांब उडी मारणाराच फसण्याचा संभव असतो. डबक्यांत पोहणारांनी मी बुडालों नाही म्हणून शिताफी मारण्यांत भूषण नसतें.

---

# अभिप्राय

## तडफ

उद्योग, उत्साह, आत्मोन्नति या मंत्राचा जप व फैलाव करण्यासाठी अवतीर्ण झालेल्या किर्लोस्करांच्या 'खबर' मध्ये तडफेचे बोल यावेत हें उचितच होय. त्यांपैकी कांही पद्यमय बोल आता 'तडफ' या काव्यसंग्रहांत एकत्रित झाले आहेत. काव्यशेखर, वसन्तविहार, ताम्हणकर इत्यादि सुपरिचित कवींचा वावर यांत आढळून येत असून, प्रकाशित नसलेल्या सात-आठ कविताहि या पुस्तकांत समाविष्ट झालेल्या आहेत. ललितकला मुख्यतः आनंददायी असतात. उद्‌बोधक असणें हें अत्यावश्यक कार्य नव्हे. तथापि आनंददायित्वाबरोबर उपयुक्तताहि साधता आल्यास, ती कलाकृति अधिक मान्यता पावेल हें उघड आहे. सहेतुक निर्मिती करण्याच्या ध्येयाने कलावन्त कार्यप्रवृत्त झाला म्हणजे त्याच्या कृतींत आनंदाला दुय्यमपणा प्राप्त होतो. प्रस्तुत संग्रहांतील कविता हेतुनिष्ठ आहेत. 'तनु त्यागिता कीर्ति मागे उरावी', 'बाबा वाक्यम् प्रमाणम्', 'असेल माझा हरी तर देईल खाटल्यावरी, 'क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे, अशा सारख्या सुभाषितांचा खण्डन–मण्डणपर कवितात्मक अनुवाद हें ह्या संग्रहाचें सार आहे. प्रतिकूल परिस्थितींतहि मनुष्याने कार्यप्रवण रहावें या हेतूच्या पोषणार्थ लिहिल्या गेलेल्या कविता, केवळ आनंदवर्धनासाठी प्रस्फुर्त झालेल्या काव्यकलाकृतीपेक्षा एखाद्या पायरीने खालीच असणार. परंतु, उपदेशपर म्हणून प्रसंगीं नीरस होणारे विषयहि कलावन्ताच्या हातीं पडले असतां कसे सरस होऊं शकतात याचें उदाहरण म्हणून या संग्रहांतील कांही कवितांकडे बोट दाखवितां येईल. विद्यार्थीवर्गास हें पुस्तक विशेषच वाचनीय आहे. ग्रंथाचें उद्दिष्ट एकच असलें तरी निरनिराळ्या लेखनशैलीमुळे विविधताहि प्रतीत होते.

य. दि. पेंढारकर.

---

# रद्दींतील रत्नें

रत्न ६ — शोधक—संपादक.

## महंमदाचा वृत्तांत

ज्ञानोदय, १६–५–५३

हल्लीं महंमदाचा वृत्तांत हें मराठी पुस्तक मुंबईतील पुस्तकप्रसारक मंडळीनें छापविलें आहे. त्याचीं पृष्ठें १६० आहेत व किम्मत बांधणीप्रमाणें सहा आणे व तीन आणे असी ठेविली आहे. हा इंग्लिश ग्रंथ रेवरेंड जी बोएन साहेबानी केला व त्याचें मराठी भाषांतर नगरांतील मिस्तर हरिपंत रामचंद्र यानी केलें. या भरतखंडांत मुसलमानलोकांनीं बरेंच राज्य केलें व ते लोक अजून पुष्कळ आहेत म्हणून त्यांचा पैगंबर कोण होता, कसा होता, व त्याने काय केलें, त्याचा धर्म कसा इत्यादि सर्व सुज्ञाहीं जाणलें पाहिजे. या पुस्तकांत निःपक्षपातानें जें वास्तविक तेंच वर्णिलें आहे, व तें घेण्याची कोणास अडचण पडूं नये असी स्वल्प किंमत ठेविली आहे. हा इंग्लिश ग्रंथहि तीन आण्यांनीं मिळतो.



अनुक्रमणिका

# वेताळ व पिशाच्च यांचीं पत्रें

[ संपादकः—शंकर गणेश दाते. ]

## प्रास्ताविक दोन शब्द.

सुमारें दोन तीन वर्षांपूर्वी गोरेगांव येथे रा. रामचंद्र विश्वनाथ अधिकारी यांचे घरची रद्दी चाळीत असतां कांही ज्ञानप्रकाशचे जुने अंक सापडले. त्यांमध्ये हीं विनोदी पत्रें उपलब्ध झालीं. मराठी भाषेंतील विनोदी वाङ्मयाचा ऐतिहासिकदृष्ट्या अभ्यास करणारांस व इतरांसही हीं पत्रें फार मनोरंजक वाटतील. निबंधमालेंत उल्लेखिलेलीं "गोल्याघुबड" व "पढतमूर्ख" यांचीं विनोदी पत्रें सध्या तरी लुप्तप्रायच आहेत असें म्हणावयास हरकत नाही. तेव्हा त्यांचे अभावीं मराठी भाषेंतील पहिलें विनोदी लेखन म्हणून शोधावयाचें झाल्यास याच लेखांकडे बोट दाखवावें लागेल. या पत्रांचा कर्ता कोण असावा तें समजण्याचा कांहींच मार्ग दिसत नाही. पण तर्क असा धांवतो कीं, "गोल्याघुबड" "वेताळ"–"पिशाच"–पढतमूर्ख हीं सर्व एकाच व्यक्तींचीं अवगुंठनें असावीं. 'वेताळ' व 'पिशाच' यांचीं पत्रें बारकाईनें वाचल्यास त्यांच्या कल्पनांत, भाषेंत, विनोदांत, विषयाच्या लेखनपद्धतींत वाचकांस फारच साम्य दिसून येईल. म्हणूनच आम्ही या नांवांचे मागें एकच व्यक्ति असावी असें म्हटलें आहे.

या पत्रांची भाषा फार साधी, संभाषणपर व चुरचुरीत आहे. विषय प्रचलित असून, त्यांवरील टीका विचार करावयास लावणारी आहे. विनोदाची अंगभूत बहुतेक प्रधान तत्त्वें अतिशयोक्ति, उपहास, व्याजोक्ति इ. इ.–यांमध्यें प्रामुख्यानें दिसून येतील. कित्येक ठिकाणीं मात्र लेखक बेफाम होऊन सभ्यपणाच्या मर्यादा उल्लंघीत असलेला दिसतो. त्याकडे वाचक कृपेने काणाडोळा करतील अशी आशा करतों.

—संपादक ]

## पत्र १ लें

Vol. 21. ] ज्ञानप्रकाश १४-६-१८६९ [ No. 24

## पुणें भावी राजधानी

**ज्ञानप्रकाशकर्ते यांस :—**

कां बरे आहांतना ? हो असालच. तुमचें ठीक आहे. आहे का कशाची काळजी ! नवरा मरो नवरी मरो भटाची दक्षणा तार्जा. मग कशाची काळजी वाहायाची ! ज्ञानाच्या प्रकाशानें पोट का भरतें. केवळ प्रकाशच पोट भरण्यास समर्थ असता तर दुसरा कोणता प्रकाश न का चालता ! पृथ्वीपति जो सूर्यनारायण त्याचादेखील केवळ प्रकाश प्राण्यांचें जीवन जें अन्न तें उत्पन्न करण्यास बस नाहीं. त्यासही दुसऱ्याची गरज आहे. तरी तुमच्या ज्ञानप्रकाशाची बिशाद काय, पण त्याणें तुमचें



अनुक्रमणिका



तर पोट भरतेंना. तेव्हां राजास दिवाळी काय, ह्याप्रमाणें तुम्हास झालें आहे. पण असें करणें ठीक नाहीं. अहो ज्या घरांत रहावें, त्याची उस्तवारी करावी लागते. व तुम्ही ज्या शहरांत राहतां, जेथें तुमच्या ज्ञानदीपास प्रकाश पाडण्यास जागा मिळाली आहे, त्याचे बरेंवाइटाचा संतोष किंवा खेद कांहीं तुम्हास आहे का ? दिव्याखालीं अंधार तद्वत् तुमच्या ज्ञानाची अवस्था आहे.

असो, तुम्हास कांहीं बातमी कळली का ? पण कशानें कळणार बरें ? धारराव उतरंड्याचा काळ ह्याप्रमाणें तुमची स्थिति बनली आहे. काढ पट्टा लाग बायकोमागें तसें तुम्ही मांडलें आहे. उठ लाग त्या बारगळ म्युनिसिपालिटीचे मागें; काय आज तिणें असेंच केलें; तिणें तसेंच पाहिलें; ती काय अमकेंच करतें; तमकेंच करीत नाहीं. मांडली किरकिर तिच्याभोंवतीं. ती काय गोसाव्यांवर फिदा झाली आहे. ती मद्राशाकडे अपांगदृष्टीनें पहाते. ती मोहनाच बनली आहे. गवंड्याशीं संगच करते. कोणाची कोण व तुम्हास हो कां रिकामी उठाठेव ? म्हाराची आई चांभार का नेईना. तुम्हास व्यर्थ पंचाइत कशाची.

अहो, त्या तुमच्या ( व आमच्या नाहीं कां ? ) पुण्याचा उर्जितकाळ समीप आला असून उगीच कां तुम्ही बसलांत. अशा आनंदाच्या खबरेची वार्ता देखील तुमच्या गांवीं नाहींना ? भले दिसतां. घरचें पक्वान्न सोडून भिकेच्या भाकरी मागत हिंडणारे आहांत. बरें, आतां तरी सावध व्हा. अहो ह्या आपल्या पुण्याच्या उत्कर्षाचा काळ सन्निध येऊन टेंकला आहे. काय विचारतां, जसें दुसरें इंद्रभुवन होऊन रहाणार आहे बरें. अहो पेशवाईंतील जुने जुने लोक ह्या शहरीची शोभा वर्णतात त्यावर तान होणार. ते म्हणत असतात कीं, कायहो त्या वेळच्या पुण्याची शोभा सांगायाची. सर्व भरतखंडांतील लोक हें शहर पाहाण्यास येत असत. येथें तऱ्हतऱ्हेच्या पोषाखाचे व अनेक भाषा बोलणारे लोक दृष्टीस पडत असत. तर तसली शोभा ह्या शहरास प्राप्त होणार आहे. काय रात्र सांगायाचें. ह्या शोभेनें पुण्यांतील सर्व लोकांचें कल्याण होणार आहे. त्यांत मात्र तुमचें व आमचें अकल्याण. पण ज्याअर्थीं सर्व शहराचा नफा होण्याच्या आनंदाचे समयास आपले नुकसानीबाबद रडकथा पुढें सारणें हें सौजन्यास दोषक आहे, सबब तूर्त आनंदाचा प्रकार कोणता तो सांगतों.

अहो ती आनंदाची गोष्ट घडून येतांच ( व न येण्याविषयीं संशय देखील नको बरें ) तेली, तांबोळी वगैरे सर्व धंद्यासच तेजी येईल. प्रथमारंभीं तर घरवाले लोकांस तेल लागेल. घराचें भाडें इतकें चढेल कीं, मुंबईवर तान होणार आहे. ह्यास्तव घरवाले व भाडेकरी लोक ह्यांनीं सावध होऊन इतक्यांतच एकमेकांपासून आपापल्या नफ्याचे करारनामे लिहून द्यावे व घ्यावे. इतर सर्व जिनसास जो चडचडाट येणार त्यांत गंध्याच्या व कासाराचे मालास विशेष येणार आहे. ह्यास्तव सर्व उदमी व्यापाऱ्यांनीं आपापले व्यापाराच्या जिनसांचा पुरवठा ह्या संधीस करून ठेवल्यास त्यांस

उत्तम नफा होणार आहे. ही संधी दडवल्यास ते पस्तावी पडतील तरी ही सूचना त्याणी वायां जाऊं देऊं नये.

ह्यावरील वर्णनावरून व येथील लोकांस चांगल्या स्थितीची आशा दाखविल्यावरून तुम्हास वाटत असेल कीं आज बरींच वर्षे हें शहर गवरनर जनरलचें राहण्याचें स्थान होऊन सर्व भरतखंडाची राजधानी होणार तो प्रसंग आला आहे. खरेंच सांगा हेंच तुम्हास वाटलें ना? पाहिलेंत आम्ही कसे मनकवडे आहोंत. पण देवास देव म्हटल्यांत का त्यास थोरपणा येतो! असो; तुम्हास वाटतें म्यावसाहेबानीं इकडे यावें नाहीं का? भले उदार धार्मिक दिसतां. त्यांनी इकडे येऊन काय करावें? पुण्याभोंवतालचे खडकाळ जमिनीची हवा घेण्यास अगर खडकवासल्याचें पाणी पिण्यास नाहीं का? मोठेच आपलपोटे आहांत. म्यावसाहेब व त्यांच्यामागें बाबासाहेब जे आपला मुलूख सोडून इतके दूर आले आहेत व येणार त्यांस स्वार्थाशिवाय परमार्थ नाहींच का? चांगले गंगातिरीं राहून नित्य गंगा प्राशन करीत खुशाल आहेत, त्यांनीं नागझरीमिश्रित मुठेचें पाणी पिण्यास इकडे यावें ना? आणि तें कशास? ज्ञानाचे जनकाचे मर्जीखातर. फार चांगली मसलत. व लिंजप्रमाणें वागणारे थोर समजले पाहिजेत. बरें तुम्ही तरी म्यावच्या गळीं इतके लुब्धून कां पडतां? पुण्यांत थोडकीका म्याव आहेत व बैाव तरी कमी कां? पेठपेठांनीं, रस्तोरस्तीं, आळोआळीं, घरोघरीं त्यांची वस्ति आहेच. बरें, तुम्हास पाहिजेत म्हणून आले हे थोरले म्यांव समजा, तर त्याजमुळें काय होणार? येतील पांचपन्नास टोपीवाले, शेंपन्नास बुटलर, शें दोनशें घोडेवाले, व महार मांग परिवार. बरें म्याव तरी असे उमदे थोर डामडौली आहेत कीं, ओळखाल तुम्ही त्यांस पाहतांच. दुसऱ्या टोपीवाल्यासारखे हे वागणार. इकडील राजेरजवाड्याप्रमाणें हे असतीलना? त्यांच्यापुढें ह्यांचें तेज देखील पडणार नाहीं. अशानें कां राजधानी बनते? इंग्रजींतील आलीकडली पोरें तुम्ही, तशांत कुंभारवेशीच्या पलीकडे कधीं गेलां नाहींत. विंग्रजीचे दोन शब्द ऐकून लागलां टुर टुर फुर फुर करायाला व घातला शहाण्याचा डौल. राजधानीची ना तोंड तुम्हास ठाऊक कशी ती आणि लागलां बोलूं तिजविषयीं. असो, म्याव अगर बाव साहेबाचे आगमनानें तुमच्या समजुतीची राजधानी झाल्यास ही आम्ही वर सांगितलेली उत्कृष्टावस्था का पुण्यास येणार होती? भले घाबरेडे दिसता. पण ही राजधानी होणार नाहीं ह्या भीतीनें उदास झालांत न लागला. पण थांबा. आम्ही वर सांगितलेलें स्थित्यंतर बनून आल्यावर म्याव मनी व परिवारासह धावत पळत येतील. बरें स्वस्थ मानसें असा. पण इतकेंच पक्कें ध्यानांत ठेवा कीं आम्ही सुचविलेली स्थिति घडून येईपर्यंत म्याव इकडे तोंड फिरवीत नाहींत.

अहो, आपल्या शेजारचे मुंबई शहरांत रामबाणाप्रमाणें संयोगजन्य रोगाक्ट बाण सुटला आहे. त्याच्या तडाक्यांत कोण सांपडणार आहेत? काय त्या गरीब, अनाथ रांडामुंडाच ना. त्यांस त्याजपासून पीडा होणार तरी आहे का कोठें कोणी



अनुक्रमणिका

त्यांचा कनवाळू, त्यांचा वाली, त्यांचा पक्षकार ? घेईल का कोणी त्यांचा पक्ष आणि मांडेल सरकारशीं ? गरीब दीन अबलांचा पक्ष घेणारा कोणीच का उरला नाहीं ? गेले कोठें सर्व तुमचे न्यायी, कनवाळू तरूण विद्वान् ? सारेच का लपले. त्या गरीब बायाबापड्यांस ठाव देणारा कोणीच का उरला नाहीं ! असो; सारे दडाले म्हणून काय झालें. त्यांचा पक्ष घेणारा कोणी तरी मायचा लेक सांपडल्याशिवाय राहातो का ? पण ह्या बायाबापड्या एक ना दोन, दहा हजारांची गणती लागली आहे. इतक्या मोठ्या समुदायास दुःख समुद्रांत पडूं द्यावें हें तुमच्या तरूण विद्वानास तरी घटतें का ?

आतां संयोगजन्य रोगाच्या आक्टापासून ह्यांस त्रास होणार तेव्हां त्यांणीं जावें तरी कोठें ! तुम्ही म्हणाल कीं, त्यांस त्रास होत असला तर त्यांस मुंबई सोडून जाण्यास नको का कोण म्हणतें ? शाबास एडिटर बापू. पण दूर कोठें गेल्यास त्यांचें पोट भरावें कसें ह्याची का काळजी तुम्हास आहे. बाळपणापासून शिकलेला धंदा सोडून त्यांणीं दुसरें काय करावें. अशा गोष्टी सांगण्यास सोप्या पण करण्यांत किती कठीण हें तुम्हास माहित आहे असें दिसत नाहीं.

कसेंही असो. त्यांची तर अवस्था ह्या प्रकारची कठीण होण्याचा प्रसंग आला आहे. त्यांचे वतीनें सरकारशीं भांडून त्यांस त्रास मुक्त करण्यास कोणी दिसत नाहीं. त्रास तरी एकदोन दिवसांचा आहे व तोही का सामान्य ? त्यांस दे धरणी ठाव होणार आहे. ह्या वीतभर पोटाची जोगवणूक करण्यास त्या माशांच्या दुर्गंधीनें भरलेल्या मुंबईस नाक हातीं धरून राहवें. तर तिकडेही पिडा होणार. पहांटे न झाली तों येणार मेले शेंवडे बेंबडे काळे, गोरे, अचकट विचकट डाक्तर. रात्रीस काय काय केलें त्याची लागणार तपासपूस करायाला. कोणत्या कशा प्रकाराची बऱ्या वाईट चालीची बायको असो, जें अंग केवळ सूर्यापासून देखील लपवायाचें त्याची करणार विचक्षणा. तसें न करूं दिल्यास करणार समन व दंडिवणार माजिस्ट्रेटाकडून. काय हें तुमच्या न्यायी इंग्रज सरकारचें राज्य ! हें राणी सरकारचें राज्य ना ? राणीसाहेब स्वतः स्त्री असून बायकांची ह्याप्रकारें विटंबना करवितात ना ? स्वजातीची कड घेऊन त्यांचें रक्षण करण्याचें तें दूरच राहिलें. उलटें आपण पुढें होऊन त्यांची विटंबना करविताहेत. आम्हास तर तुमचे राणीसाहेब स्त्री जातींतील असण्याविषयीं अंदेशा येतो.

बरें त्यांचा न्यायीपणा तरी कोणत्या प्रकारचा पहा. दोन पदार्थ एके जागीं केल्यास त्याजपासून जो तिसराच परिणाम होतो तो दोहोंतून एकाचाच गूण अगर दोष असें कोणाच्यानें म्हणवेल का ? स्त्री व पुरुष रत झाल्यापासून एखादा सुखदुःख जनित परिणाम झाल्यास तो स्त्रीपासूनच घडून आला असें म्हणणें न्याय का समजायचा ? स्त्रीपुरुषांच्या संयोगापासून पुरुषासच मात्र इजा होतें, व बायकास का होत नाहीं ! बायकोस गरमीची पीडा असल्यास तिजपाशीं जाणाऱ्या पुरुषास ती बाधते ही गोष्ट खरी, पण पुरुषास नसते का गरमीची पिडा ? एकादा रोगी पुरुष एखादे ह्यानसे बायकोकडे गेला तर तिला नाहीं का होत त्याजपासून बाधा ? कोणाच्यों निहा रोगी

नाहीं म्हणवणार नाहीं व असें असतां केवळ अबलांवरच जुलूम कां ? त्यांचेच झांकीव अंगाचा मात्र तपास व्हावयाचा, व पुरुषांचा तपास मुळींच होऊं नये. खरें तुमच्या इंग्रज सरकारचें राज्य न्यायी !! तुमच्या वर्तमानपत्रांतून कधीं कधीं आमचे पाहण्यांत येत असतें कीं, तुमचे व तुमच्या न्यायी इंग्रज सरकारचे दृष्टीनें पुरुषांची व बायकोची एकच योग्यता आहे. बायकोचे हक्क पुरुषाप्रमाणें आहेत. त्यांत काडीमात्र कमताई नाहीं ! व तुम्हीं त्याजकरितां मोठ्या वक्तृत्वानें प्रसंगीं लिहीत असतां. तर हें कां सर्व बोलायाचेंच कां ? खरा प्रसंग आला म्हणजे कृती मात्र भिन्न. तुमचें सरकार व तुम्ही अशा प्रकारचे ढोंगी दिसतां. तुमचें बोलणें एक व कृति दुसरी. असें नसतें तर वेश्यांची डाक्टरामार्फत तपासणी व्हावयाची तशी वेश्यागमन करणारे बिसनीचीही होण्याविषयीं कायद्यांत कलम नसतें कां ? न्यायानें राज्य करणें महान् कठीण काम आहे. राजनीतीचा पहिला धडा म्हटल्यास ज्याप्रमाणें राजानें बोलावें त्याप्रमाणें चालावें असें आहे. व तसें जर होईल तरच न्यायी राज्य म्हणायाचें. आमचेंही राज्य आहेच. पण त्यांत अगदीं बेदाद अन्याय व्हावयाचा नाहीं. कधीं आमच्या प्रजेच्या दुःखाची आरोळी तुमच्या कानीं आली आहे कां ? आमच्या राज्यांत संयोगजन्य रोग मुळींच नाहीं व त्याजमुळें त्याजबाबद कोणत्याही प्रकारचा आक्ट करणें जरूर नाहीं. पण तसा प्रकार नसतां असल्या रोगाचा बंदोबस्त करणें जरूर पडलें असतें, तर आमचे हातून कोणत्या प्रकारचा अन्याय घडला नसता व कदाचित् घडला तर आमची प्रजाही मुकाट्यानें सोसून घेती ना. आमची प्रजा किती व कशी आहे हें तुम्हा मानवांस ठाऊक आहेच. तर आम्ही असा ठराव केला असता कीं, ज्या अर्थीं संयोगजन्य रोग स्त्रीपुरुषांस होणार व एकास असला तर दुसऱ्यास त्याची बाधा झाल्याविना राहणार नाहीं. तरी दोघांची तपासणी व्हावी. हास्तव आम्ही एकंदर त्याचा बंदोबस्त अशा प्रकारचा केला असता कीं, त्याजपासून खरोखरी सर्वांस सुख होऊन आमच्या लोकांचा फायदा झाला असता. पहिल्यानें सर्व वेश्या शहराचे एके भागांत ठेवतों. नंतर डाक्टरांस नेमून त्यांची हरवक्त तपासणी करण्यास लावतों व त्याजकडे जाणारे पुरुषांची तपासणी करण्याचा हुकूम देतों. ज्या भागांत वेश्या राहणार त्याच स्थळीं डाक्टरांचें वास्तव्य असण्याविषयीं हुकूम करतों व जो पुरुष वेश्येकडे जाणार आहे त्याणें पहिल्यानें डाक्तरांचें सर्टिफिकिट घेतल्याविना जाऊं नये. अशा सर्टिफिकिटाशिवाय कोणी जाईल व जी वेश्या त्यास घेईल त्या दोघांस शिक्षा करतों. अशानें संयोगजन्य रोग निश्चयानें नाहींसा होईल, व लोकही लाजेनें व भिडेनें हळूहळू वेश्यांकडे जाण्याचें सोडतील. दिसानुदिवस वेश्यांची संख्या कमी होईल, व एकंदरींत लोकांचें कल्याण होईल.

कां एडिटरबाबू आहे ना आम्हा पिशाचांचे शहाणपणाचा खरोखरी प्रकाश. पण तुमचे शहाणे इंग्रज राजे हा शहाणपणा स्वीकारणार होते कां ? ते शहाणे म्हणवितात ते कोठले दुसऱ्याचें शहाणपण चालूं देणार ? तशांत आम्हा पिशाचांचें.

असो, ज्या अर्थी संयोगजन्य रोग आक्त बाण मुंबई शहरावर सुटून गरिबा अबलांवर त्याचा प्रयोग होणार त्या अर्थी त्याजपासून काय परिणाम होणार त्याचा विचार केला पाहिजे.

इतकें खचित कीं, त्या गरिब पोटार्थी बायांस मुंबई सोडली पाहिजे. आतां त्यांणीं जावें तरी कोठें? दूर एकादे जागीं जावें तर त्यांचा रोजगार चालतो कसा? जवळ आसपास रहावें तर एकना दोन दहा हजारांचा समावेश होण्यास जवळपास सोयीवार जागा नाहीं. तेव्हां सर्वांनीं आपल्या पुणें शहरास येऊन डेरा देण्याचें ठरविलें आहे. शहाण्या खऱ्या. पुण्यासारखी दुसरी सोयीवार जागा त्याना दुसरी कोठली सांपडणार व त्याणीं ह्या ब्राह्मणी राजधानीच्या उत्कर्षास शक्त्यनुसार अर्घ्यप्रदान करूं नये तर दुसरें कोणतें सुकृत्य करावें? शिवाय पुणें व मुंबई मध्यें आगगाडी जारी असले कारणानें त्यांचे भक्तांस येणें जाणें सोयीवार पडणार आहे. आतां काय विचारतां. सर्व देशच्या पदमिणी, हस्तिणी, चित्रिणी; शंखिनी इकडे येऊन आपल्या वास्तव्यानें शहरास शोभा आणणार. आतां काय म्हणतां. चैन का नाहीं ह्या शहराची. हिंदुस्थानी, कोंकणी, घाटणी, कानडी, तैलंगी, मलबारी, गोंवेकरणी, मारवाडणी, इंग्रजी, फ्रेंच, इटालियन, जर्मन, डच नांवें तरी किती घेऊं? कितीही आणखी घेतलीं तरी संपावयाचें नाहींच. ह्या सर्वांची गर्दी येथें होणार आहे. तेव्हां नाहीं का ह्या शहराचा उत्कर्ष समजायाचा. व अशाप्रकारें त्याचा भरभराट झाल्यावर म्याबसाहेब धांवत पळत, रडत मरत येऊन हें स्थान आपली राजधानी करणार. ह्यास्तव तुम्ही लौकर ही गोष्ट येथील जनांस कळवून व यानिमित्त उत्साह लौकर करा. येथें नुसत्या दहा हजार कळावंतीणींचा ताफा येणार. समजलांत कां? त्यांच्या मागें त्यांच्या म्हाताऱ्या, त्या म्हाताऱ्यांचे जुनाट यजमान, त्यांचीं वायकापोरें. आश्रित व चाकर, कळवंतिणींचे दलाल, त्यांचा परिवार त्यांचीं कुत्रीं, मांजरें. त्या लाडक्या चतुष्पदांचे परिवार. त्यांचे स्नेहीसंबंधी. कां हिशेब करा पाहूं? किती संख्या होते ती बिनचूक सांगा. आतां इतके सर्व प्राणी पुण्यास येऊन वास्तव्य करणार तेव्हां लहान का ह्यांची वस्ती होईल? शिवाय दर शनवारीं, सणवारीं, व सुट्टीवारीं मुंबईचे इश्कि बिसनी लोक येणारच तर आगगाडीचाही भरभराट कसा होईल. हें शहर तर केवळ इंद्रभुवनच दिसूं लागेल.

ह्या शहराचा इतका भरभराट होणार हें ठीक झालें पण मुंबईस वेश्यांचा अभाव झाल्यामुळें लुले, पांगळे, आंधळे, बहिरे, व्याधिग्रस्त अशा चैनी, इश्की, लोकांस इतकें दूर येण्यास कांहीं अंशीं पीडा होणार तर त्यांची सोय करण्याकरितां व कोणत्याही व्यापारांत पैसा मिळत असल्यास तो करण्यास सिद्ध असे जे मुंबईचे वाणी, भाटे लोक ह्यांनीं आपल्या मुलीस कळावंतिणीची विद्या शिकविण्यास व त्या तयार करून त्याजमुळें संपत्ति मिळविण्याचे उद्योगास लागले आहेत. हें तुम्हास समजलें का? मुंबईतील वाणी व भाटे लोकांच्या मुलींच्या शाळेंतून गवये व बजवये ठेवून त्या मुलींस कलांत

प्रवीण करण्याचा उद्योग त्यानी इतक्यांत सुरू केला आहे. शाबास वाणी भाट्यांची. व्यापाराचे कामीं खरोखरी हिया करणारे व चतुर. पुढें मुंबईंत दुष्काळ पडणार. इतक्यांत योग्य जिनसांच्या पुरवठ्याचे उद्योगास लागले. पिढ्यानगणती गोस्वामी महाराजांनीं शिकविलेल्या धंद्याचा उपभोग सर्व जनास देण्यास तयार झाले आहेत. ह्याचें नांव औदार्य. पण तेलकट तुपकट बनयाच्या ह्या चैनी, लोकांचे पसंतीस उतरतील ह्याचा मात्र अंदेशा. पण त्यांनी तर आपणाकडून तयारी केली आहे. आतां पाहूं. ह्या व्यापारांत निष्णात अशा वाणी भाट्यांचें उदाहरण मुंबईंतील दुसऱ्या कोणकोणत्या जाती स्वीकारताहेत, त्या गोमांतकाकडील अस्सल राहणाऱ्या जातींचा तर ह्या घरचा धंदा. तेव्हां त्या पुढें सरसावण्यास मागें पाहणार नाहींत असें वाटतें.

हें सर्व नीटच आहे. पण वर सांगितल्याप्रमाणें एडिटरबाबू तुमचें व आमचें ह्यांत नुकसान व अडचण तर खचित आहे. अशी इतकी दाटी इकडे होणार तेव्हां अंधःकारही बराच पडेल. तर तुम्हास तुमच्या ज्ञानदीपांत तेलवात ज्यास्ती घालून मोठा प्रकाश पाडण्यास खर्च येणार आहे व आपल्या लेखणीनें ज्ञानदीप निरंतर सारावा लागेल. ह्याची तयारी असावी.

आमची अडचण म्हणाल तर विशेष आहे व नाहीं. आम्हास काय तुमच्या गांवांत थोडेंच वास्तव्य करण्याचें आहे. आमचा भला बापडा वटवृक्ष. पाहिजे तेवढी जागा. पण काळजी आमच्या सटवीची. ह्या गर्दींत तिची जागा राहण्याची भ्रांत. पण कांहीं फिकिर वाटत नाहीं. मोठा सनाटा वटवृक्ष आहेच. तेथें तिची सोय करतां येईल, पण अडचणच. तुम्हास जागेची काळजी पडल्यास खुशाल आम्हास विनंती करावी. तुम्हास तुमच्या परिवारासह व ओळखीदेखीच्यासुद्धां आमच्या वटवृक्षीं जागा देऊं बरें.

वेताळ.

## पत्र २ रें

Vol. 21.] ज्ञानप्रकाश १८-६-१८६९ [No. 26.

## सत्याचा जय व असत्याचा लय.

ज्ञानप्रकाशकर्ते यांसः—

राम राम एडिटर बाबू, राम राम; खुशाल? असालच. नसाल तरी कां? तुमची आमची गांठ पडून आठ दिवसही लोटले नाहींत तों पुनः भेटीचा प्रसंग आणलात. असो, कांहीं फिकिर नाहीं. त्या वेळीं तुम्ही ज्या ब्रिटिश सरकारचा स्तुतिपाठ करून आपला निर्वाह करतां त्याच्या अन्यायाचें उदाहरण तुम्हास दाखविलें. आज तर तुम्हावरच तलवार उपसली आहे, पण ह्या जबरीच्या लिहिण्याकरतां तुमच्या ज्ञानप्रकाशांत हें पत्र वाचल्याविना राहूं नका बरें. नाहींतर आमच्या भेटीचा जो लाभ पत्रद्वारा होत आहे तो साक्षात् होईल हें पक्कें समजा.

अनुक्रमणिका

का एडिटर बाबू, तुम्ही आपणास निःपक्षपाती म्हणवितां नाहीं का? निदान डौल तर त्या प्रकारचा घालतां. आपल्या दोन वीत पत्राचेंही नांव मोठ्या डौलाचें ठेवलें आहे. काय तर ' तिमिरनाशक ज्ञानप्रकाश ' तर हा ज्ञानदीप आपल्या हातानें आपल्यास ओवाळून घेण्यांत का थोरवी आहे? दिवा दुसऱ्यास प्रकाश देतो पण त्याच्याखालीं अंधार, ह्याप्रमाणें तुमच्या ज्ञानदीपाची अवस्था आहे. पण असें व्हावें हें तुम्हास शोभत नाहीं व असें तुमच्या हातून झालें आहे हें तुमच्या पदरांत बाळतों.

अहो ज्या धर्मांत, ज्या देशांत, ज्या लोकांत तुम्हास परमेश्वरानें जन्मास घातलें आहे त्यांच्याविरुद्ध कांहीं बोलण्याचा तुम्हास प्रसंग आला तो न जाऊं देण्याविषयीं तुम्ही किती तत्पर असतां. कसे वाचाळ होतां, व किती वक्तृत्व योजतां. पण तोच धर्म, देश व लोक ह्यांस अनुकूल अशी एखादी गोष्ट तुमच्या समजण्यांत आली असतां ती प्रगट करण्याचें नांव नाहीं. होईल तेवढ्या प्रकारानें दावून टाकायाची. असें का होतें ह्याचें कारण पुढें सांगतों? पहिल्यानें हल्लीं कोणत्या गोष्टीविषयीं तुम्ही ह्याप्रमाणें वागलां आहांत हें सांगतों.

क्यामिरन ह्या नांवाचे एक साहेब कलकत्त्यास आहेत. हे पूर्वी कित्येक देशांत फिरले आहेत. ह्यानीं कलकत्त्यांतील इंडियन डेली न्यूज पत्रकर्त्यास लिहिलें आहे कीं, पासिफिक महासागरांत ईस्ट इंडिस नांवाचीं बेटें आहेत त्यांत बोर्निओ म्हणून बेट आहे. तेथें आपली वस्ती फार दिवस होती. बेट मोठें विस्तीर्ण आहे. त्या बेटाचे दक्षण किनाऱ्यावरील बंदरांतून आपण पुष्कळ हिंडलों आहों. तेथें असतां त्या बेटांतील कांहीं राहणाऱ्या लोकांचें व आपलें पुष्कळ दळण वळण पडलें होतें. आम्ही पुष्कळ वेळां गोष्टी सांगत बसूं. त्या गोष्टींत त्या लोकांचे सांगण्यांत आलें कीं, त्या बेटाचे मध्यभागास मोठें विस्तीर्ण रान आहे. त्या रानांत जंगली लोक रहात आहेत. ते थोडेना थोडके. त्यांचे गांवचे गांव त्या जागीं वसलेले आहेत. ते लोक फारसे अथवा मुळींच आम्हांत मिसळत नाहींत. सावजें वगैरे शिकार करून रहात असतात. ते अगदींच रानटी अवस्थेंत आहेत. विशेष सांगायाचे कीं, त्या लोकांस पुच्छ आहे. ह्या लोकांची व आम्हापैकीं कित्येकांची रानांतून गांठ पडली आहे, व त्यांची आमची सलगी असल्यावेळीं कधीं कधीं आम्ही त्यांचे पुच्छास हात लावून पाहिलें आहे. तें चार इंच लांब असून कांहींसें टणक असतें. ह्या लोकांच्या घरीं त्यांस बसण्यास बांक असतात. त्यांस जागजागीं भोकें पाडलेलीं असतात. त्याचा उद्देश असा कीं, ते लोक त्या बाकांवर बसले असतां त्यांच्या शेपटांमुळें त्यांस बसण्यास अडचण पडूं नये. गरीब लोक दोन फळ्या अगर लांकडें ठेवून त्यावर बसतात. तेणेंकरून त्यांस आपलें शेपूट त्या दोन लांकडांमध्यें ठेवून अडचण न होतां बसतां येतें. ह्या लोकांचीं शस्त्रें काय तीं तीरकामठे. हे लोक शत्रूपासून आपला बचाव करणें व निर्वाहाकरितां शिकार मारणें हीं कामें करतात.

ह्या मजकुराचें पत्र क्यामिरन साहेबानीं इंडियन डेली न्यूज ह्यामध्यें छापून प्रसिद्ध केल्यावर दुसरे एक दोन साहेब जे क्यामिरन साहेबांप्रमाणें त्या बेटांत कांहीं

दिवस राहिले होते व ज्यांनीं वर सांगितल्या लोकांविषयीं मजकूर ऐकला होता त्यांनीं * * * व दुसऱ्या इंग्रजी वर्तमानपत्रांत मजकूर लिहिला आहे कीं, सदर्हू मजकूर आमचेही ऐकण्यांत आला. व हा सर्व मजकूर इकडील सर्व इंग्रजी वर्तमानपत्रांतून प्रसिद्ध होत आहे. क्यामिरन साहेबांनीं आणखी असें लिहिलें आहे कीं बोर्निओ बेटास जाऊन त्या लोकांचा पत्ता लावण्यास व साधल्यास त्यांपैकीं एकदोन लोकांस आपणाबरोबर घेऊन येण्यास आपण सिद्ध आहों. पण ह्या कृत्यास खर्च येणारा आहे. व निदान पांचसहा लोक मजबरोबर पाहिजे आहेत; कारण हें एकट्याच्यानें होणारें काम नाहीं तरी पैशाची मदत होत असल्यास बरोबर येणारे लोकांची तजवीज करण्यांत येईल.

कां एडिटर बाबू हा मजकूर इंग्रजी वर्तमानपत्रांतून असून एतद्देशीय कोणत्याच वर्तमानपत्रांत आढळत नाहीं. बाकीच्या वर्तमानपत्राविषयीं आम्हास फारशी चौकशी नाहीं. पण तुमचा आमचा पत्रव्यवहार तेव्हां तुम्हाविषयीं चौकशी करावेंसें वाटल्यावरून हें पत्र लिहिण्यांत आलें आहे. वरील मजकूर आपल्या वाचणारांपासून छपवून ठेवण्याचें कारण आम्हीं समजलों. तुम्हा सर्वांचा उद्देश एकच आहे. ही बातमी प्रसिद्ध केल्यास व क्यामिरन साहेबांच्या शोधास येथील लोकांनीं मदत दिल्यास व पुढें शोधाअंतीं ह्या लोकांच्या अस्तित्वाविषयीं विवा * * (दन ?) राहिल्यास हिंदू धर्मास मोठी बळकटी येणार आहे. तरी असें करणें बरोबर नाहीं असें तुम्हां सर्व एतद्देशीय पत्रकर्त्यांस वाटलें असावें.

आतां पुच्छयुक्त मनुष्यें ह्या जगांत हल्लीं आहेत ह्या गोष्टीपासून हिंदुधर्मास बळकटी कशी येते ती ऐका. रामायणांत सांगितलें आहे कीं मारुती व त्याची सेना ज्यास वानरसेना म्हटलें आहे हे सर्व पुच्छयुक्त मानवी होते. आतां एक हिंदुधर्म मानणारे खेरीज करून इतर सर्व धर्मी लोक व विशेषतः ख्रिस्ती धर्मी युरोपिअन लोक व त्यापेक्षांही ह्या देशांतील नूतन इंग्रजी शिकलेले लोक जे आपणास सुधारले म्हणतात व हिंदुधर्माविरुद्ध हरएक प्रकारचे आनाचार करतात त्यांस ही गोष्ट खोटी वाटते. त्यांत हिंदु शास्त्रांत चार युगें सांगितलीं आहेत तीं असंभाव्य वाटताहेत. व हिंदुधर्माबाबद दुसऱ्या अनेक गोष्टी तद्वतच भासतात. पण डारविन साहेब म्हणून महान पंडित आहेत त्यांनीं प्राण्याविषयीं दीर्घ शोध करून त्याची शरीररचना व दुसऱ्या गुणावरून असें मत सबळ कारणानीं सिद्ध केलें आहे कीं मनुष्य हा प्राणी जगाच्या उत्पत्तीच्या वेळेस झालेला नसून लहान किडयापासून एक एक विशेष प्राणी होत होत मनुष्याच्या हल्लींच्या स्थितीस येऊन पोहोंचला आहे. व मनुष्यास मनुष्य देह उत्पन्न होण्याअगोदर तो पुच्छयुक्त प्राणी म्हणजे वानराप्रमाणें होता व ह्याप्रमाणें एका प्राण्यापासून दुसऱ्या प्राण्याचें स्थित्यंतर होऊन ह्या मनुष्य स्थितीस पोहोंचण्यास जग फारच जुनें म्हणजे अनादिसिद्धच असलें पाहिजे.

आतां जर बोर्निओ बेटांत हल्लीं शेपटाचीं मनुष्यें सांपडलीं तर डार्विन साहेबाचे मतास दृढीकरण होणारें आहे. व त्याहिपेक्षां हिंदुधर्मास विशेष होणार आहे. त्यावरून

असें सिद्ध होईल कीं, ह्या दंडकारण्यांत रामायणांत सांगितलेलीं पुच्छाचीं माणसें असावीं. तीं जाऊन पुढें हल्लींचीं माणसें झालीं. त्याजवरून त्या गोष्टीस पुष्कळ वर्षें झालीं असावीं तरी हिंदुशास्त्रांत जीं युगें सांगितलीं आहेत व त्यांच्या मुदती लिहिल्या आहेत त्याही खऱ्या असाव्या. तसेंच त्यावेळीं राक्षस म्हणजे शरीरानें मोठमोठे रानटी अवस्थेंतील लोक असावे; कारण पृथ्वींत मोठमोठाल्या मनुष्यादि प्राण्यांचे हाडांचे सांपळे सांपडताहेत. अशी हिंदुधर्मांचे खरेपणाविषयीं अनेक दाखले सांपडतील.

अशी हिंदुधर्माचा खरेपणा तुम्हां मानव्यांस सिद्ध करून दाखविण्याचा उत्तम प्रकारचा पुरावा सांपडण्याचा प्रसंग असतां ती गोष्ट तुम्ही छपावून ठेवतां हें नीट का करतां ? तुम्ही प्रसिद्ध करीत नाहीं त्याचें कारण आम्ही समजलों. तुम्हास ह्या सुधारलेल्या लोकांची व परधर्मी अनाचारी लोकांची आवड म्हणून तुम्ही असें करतां. वर सांगितलेल्या पुराव्यानिशीं हिंदुधर्मांचा खरेपणा सिद्ध झाल्यावर सर्वच लोक हिंदु-धर्म स्वीकारण्यास सिद्ध होतील. नानाप्रकारचे अनाचार जे ह्या जगांत हल्लीं उघड प्रकारानें चालले आहेत ते नाहींसे होतील. त्यांत ह्या अनाचारांची नूतन गोडी लाग-लेले व सुधारलेले लोक ह्यांचें फारच नुकसान होणार आहे. हिंदुधर्माचा खरेपणा स्थापन होऊन त्याप्रमाणें वागण्याची अवश्यकता प्राप्त झाली म्हणजे मांसादिक भक्षण करण्यास कोठलें सांपडायाला बाटलाजी उपासना कोठली व्हावयाची, व तिच्या उपा-सना अनुसंगिक दुसरीं वाईट परिणामाचीं त्यावेळीं गोड वाटणारीं सुखें कोठलीं मिळा-वयाचीं ? पण एडिटर बाबू, ह्या लोकांचा पक्ष घेऊन सत्याचा अनादर करणें व त्यायोगें जगदोद्धारा आड येणें हें तुम्ही नीट करीत नाहीं हें तर सांगतों तें ऐका.

बोर्निओ बेटांतील हीं पुच्छयुक्त माणसें म्हणजे मारुतीसेना ह्यांचा पत्ता क्यामि-रन साहेब लावण्यास सिद्ध आहेत. त्यांस अगर दुसरा कोणी ह्यांचा पत्ता लावण्यास सिद्ध होईल त्यास पैशाची मदत होण्याकरतां वरील मजकुराची जितकी प्रसिद्धी होईल तेवढी करून वर्गणी जमविण्याची तजवीज चालूं द्या. तुम्ही वर्गणी गोळा करतां ती रामसेनेच्या शोधाकरतां करतां असें हिंदू लोकांस समजलें म्हणजे त्या धर्माचा प्रत्येक मनुष्य शक्त्यनुसार वर्गणी देणार आहे, व तेणेंकरून पुष्कळ पैसा गोळा होईल. नंतर त्यापैकीं कांहीं पैका क्यामिरन साहेबांस देऊन त्यांस त्या शोधास पाठवावें. एकट्या क्यामिरन साहेबांचे शोधावर भरंवसा ठेवूं नये. दुसरे कोणी लोक ह्या शोधास जाण्यास सिद्ध असल्यास त्यांसही ह्या पैक्यांतून मदत करून पाठवावे. रामसेनेचा शोध करण्यास कित्येक हिंदूही तयार होतील; कारण त्यांच्या धर्माचें हें काम असून चिरायु जो मारुती त्याचेंही दर्शन त्यांस तेथें घडेल, व ते उद्धार पावतील.

ह्यास्तव एडिटर बाबू, तुम्ही खोटा अभिमान सोडा, व ह्या सत्याच्या शोधाचे कामीं झटून असत्याचा लय करण्याचें श्रेय घेण्याविषयीं तुम्हास बुद्धिवाद करतों तो स्वीकारा.

---

बेताळ.

## परिषद्वार्ता

मागील अंकीं प्रसिद्ध केल्याप्रमाणे परिषदेची आजतागायत दुरुस्त्या केलेली घटना सभासदांकडे या अंकासोबत वेगळी पाठविण्यांत येत आहे.

नागपूर संमेलनांत मंजूर झालेल्या ठरावांचा विचार करून त्याबाबत परिषदेचें धोरण ठरविण्यासाठी कार्यकारी मंडळाची सभा ता. २८।१।१९३४ रोजीं भरली होती. या सभेंत संमेलनाने सुचविल्याप्रमाणे गोवें व हैद्राबाद येथील सरकारांकडे तिकडील मराठी भाषाविषयक अडचणींची दाद मागण्याकरिता शिष्टमंडळें पाठविण्याची योजना ठरली आहे. या योजनेसंबंधांत गोंवें व हैद्राबाद येथील स्थानिक पुढारी मंडळींशीं विचारविनिमय चालू असून तो व शिष्टमंडळांची इतर व्यवस्था पूर्ण होतांच हीं शिष्टमंडळें तिकडे रवाना होतील.

नागपुरास मंजूर झालेल्या परिषद्-संमेलनविषयक ठरावाचाहि विचार होऊन परिषद् व संमेलन यांच्या परस्परसंबंधाविषयीं निश्चित योजना सुचविण्यासाठी प्रि. ध. रा. गाडगीळ यांच्या अध्यक्षतेखाली एक उपसमिति नेमण्यांत आली आहे, परंतु तिचें काम अद्यून फारसें होऊं शकलें नाही.

संमेलनांतील इतरहि सर्व ठरावांचा कार्यकारी मंडळाच्या सभेंत विचार होऊन त्यांची मंडळाच्या हुकुमाप्रमाणे शक्य ती अंमलबजावणी परिषदेच्या कचेरीने केली आहे. या सर्व अंमलबजावणीचें इत्थंभूत इतिवृत्त पुढील संमेलनास सादर केलें जाईल.

पुढील संमेलन सहाविचारिणी सभेमार्फत बडोद्यास होणार, तेव्हा त्या सभेशीं व संमेलनाच्या पूर्वतयारीकरिता सभेने बनविलेल्या समितीशीं विचारविनिमय करणें, परिषदेच्या कायमनिधीच्या योजनेसंबंधांत श्री. महाराजसाहेबांची सहानुभूति मिळविणें व परिषदेच्या कार्याचा सामान्य प्रचार करणें या कामाकरिता कार्याध्यक्ष श्री. ना. गो. चापेकर व चिटणीस श्री. रा. दा. देसाई हे एप्रिलच्या आरंभीं मुद्दाम बडोद्यास गेले होते. श्री. महाराजसाहेबांनी विलायतेस जाण्यासाठी बडोदें आधीच सोडलें असल्याने त्यांची भेट होऊं शकली नाही. परंतु श्रीमंत सौ. महाराणीसाहेब व श्रीमंत राजस्नुषा कमलादेवीसाहेब यांच्या मुलाखती मिळाल्या. तसेंच श्री. दिवाणसाहेब व श्री. विद्याधिकारी यांच्याहि भेटी घेऊन परिषदेच्या अधिकाऱ्यांनी त्यांच्याशीं "अॅकॅडेमी ऑफ इंडियन लँग्वेजेस" या श्री. महाराजसाहेबांनी योजिलेल्या संस्थेच्या योजनेबाबत चर्चा केली. (या चर्चेंतच या संस्थेच्या मराठी विभागापुरत्या कांही विधायक सूचना करण्यासंबंधी श्री. विद्याधिकारी यांनी कार्याध्यक्षांस सुचविल्यावरून कार्याध्यक्षांनी पुण्यास परत आल्यावर श्री. तात्यासाहेब केळकर यांच्या सल्ल्याने परिषदेतर्फे लेखी सूचना बडोदें सरकारच्या विचाराकरिता सादर केल्या आहेत.)



अनुक्रमणिका

बडोद्यास होणाऱ्या संमेलनाच्या व्यवस्थापक समितीशींहि सयाजी-विहार-क्लबमध्यें मुद्दाम बोलाविलेल्या सभेंत विचारविनिमय झाला; आणि परिषद् व संमेलन यांचे संबंध सलोख्याचे असल्याबद्दलचीं आश्वासनें देण्याघेण्यांत आलीं.

बडोद्याकडील प्रचारांत परिषदेस पुढीलप्रमाणे सभासद मिळाले.

**तहाहयातः—**

१ श्री. गं. मा. तांबे, बडोदें
२ श्रीमंत अवधूत रावराजे शिर्के, बडोदें
३ डॉ. भा. चिं. लेले, बडोदें (साधारणांतून तहाहयात)

**साधारणः—**

१ श्री. बा. दा. खरे, बडोदें
२ श्री. गो. ल. आगाशे, बडोदें
३ श्री. दा. ना आपटे, बडोदें
४ श्री. कृ. वा. मराठे, बडोदें
५ श्री. कृ. शं. काठेवाड दिवाणजी, बडोदें
६ श्री. चिं. गो. जोशी, बडोदें
७ श्री. वा. वि. जोशी, बडोदें
८ श्री. म. का. कोल्हटकर, बडोदें
९ श्री. ल. वा. घाणेकर, बडोदें
१० श्री. वि. वा. जोशी, मूल
११ श्री. श्री. शा. हणमंते. मोहोळ

संमेलनप्रसंगीं तिकडील भागांत परिषदेस आणखी सभासद मिळतील अशी आशा आहे. या सर्व कामांत प्रो. चिं. वि. जोशी, श्री. वा. वि. जोशी, श्री. दा. ना. आपटे वगैरे मंडळींचें परिषदेस विशेष साहाय्य झालें. याबद्दल परिषद् त्यांची आभारी आहे.

बडोद्यास झालेल्या कार्याचें निवेदन करण्याकरिता व त्यासंबंधी पुढील धोरण ठरविण्याकरिता कार्यकारी मंडळाची आणखी एक सभा ता. २२।४।३४ रोजीं भरली होती. बडोद्याच्या सहविचारिणी सभेस, तीस परिषदेशीं 'सहकारी संस्था' म्हणून जोडून घेण्याचा रीतसर विधि पूर्ण झाल्यानंतर एकोणिसावें साहित्य संमेलन भरविण्याची रीतसर परवानगी द्यावी असें ठरलें.

नवीन घटनेप्रमाणें एप्रिलमधील वर्षारंभानंतर तीन महिन्यांच्या आंत मागील वर्षाचे हिशेब व अहवाल व पुढील वर्षाचें अंदाजपत्रक मंजूर करण्यासाठीं नियामक मंडळाची सभा भरावयाची असते. तींत व्हावयाच्या कामांचा पूर्वविचार करण्याकरिता कार्यकारी मंडळाची सभा पुनः ता. १३।५।३४ रोजीं भरत आहे.

ता. ९।५।१९३४.

चिटणीस, म. सा. परिषद्

## ता. १ जानेवारी १९३२ ते मार्च १९३३ सालचा जमाखर्च.

५०२-७-० श्री शिल्लक मागील साल अखेर
(ता ३१ डिसेंबर १९३१ अखेर)
२५-११-० रोकड शिल्लक
२६४-१२-० नांवें ना. गो. चापेकर
२०७-०-० नांवें- सुं. भा. वैद्य
५-०-० व्यांकेंत शिल्लक
५०२-७-०

चालू सालांतील जमा
१२१०-९-० वर्गणी
३००-०-० देणगी
४-८-० जाहिरात
११-२-० विक्री
१०००-०-० व्याज
२५२५-११-०
२-६-० लोकांचें देणें.
२-६-० शं. गो वैसास
३०३०-८-०

एकूण तीन हजार तीस रुपये आठ आणे.

४७६-१२-० लोकांकडे येणें :—
२६४-१२-० ना. गो. चापेकर
२०७-०-० सुं. भा. वैद्य
५-०-० व्यांक
४७६-१२-०

चालू सालांत खर्च
१६६९-१३-० छपाई खातें.
२९०-५-० टपाल खातें.
१०-१-९ सादील खातें.
७०-२-० प्रचार खातें.
२७-८-० प्रवास खर्च.
१-८-६ हमाली खर्च.
७-५-० रेल्वेकडील वाहतूक
७-०-० अंक वाटणावळ
१२-७-६ ग्रंथ खरेदी.
१३९-०-० कचेरी भाडें.
४-१५-९ कचेरी खर्च मिटिंगचे वेळीं
११५-८-० पगार.
५७-२-६ मेहनताना.
२-९-० सामान खरेदी.
६-१३-६ कमिशन खातें.
०-८-० वट्टा खातें.
२४२२-११-६
१०२-१०-० लोकांकडे येणें.
१७-०-० सुं. भा. वैद्य
८५-१०-० ना. गो. चापेकर
३००२-१-६



अनुक्रमणिका

२८–६–६ अखेर शिल्लक.

३०३०–८–०

एकूण तीन हजार तीस रुपये आठ आणे.

हिशेब तपासून पाहिले बरोबर आहेत.

नारायण गोविंद चापेकर, कार्याध्यक्ष.
कृष्णाजी पांडुरंग कुलकर्णी, चिटणीस.
माधवराव पटवर्धन, चिटणीस.

ग. स. मराठे, हिशेब तपासनीस.

---

## ग्वाल्हेर–अक्कलकोट राजघराण्यांवरील दुर्धर प्रसंग !

गेल्या मार्च महिन्यांत ग्वाल्हेरीस राजघराण्यांत जो अपूर्व विवाहसोहळा झाला त्या समारंभास ग्वाल्हेर राजघराण्याची साहित्यप्रीति लक्षांत घेऊन राजदंपतीच्या अल्पस्वल्प अभिनंदनार्थ परिषदेचे अध्यक्ष श्रीमंत सरदार मा. वि. किबेसाहेब हे अधिकृतरीत्या हजर राहिले होते. परंतु हा सोहळा आटोपल्यानंतर महिन्याच्या आंतच ग्वाल्हेर-अक्कलकोट राजघराण्यांत घडून आलेला हा संबंध निर्घृण नियतीनें कसा तुटला हें सर्वश्रुतच आहे. दोन्ही राजघराण्यांवरील या शोकाच्या प्रसंगीं परिषद्हि त्यांच्या दुःखांत सहभागी आहे. परिषदेतर्फे दुखवट्याचा ठराव ग्वाल्हेर व अक्कलकोट येथील अधिपतींकडे रवाना झाला आहे.

# संपादकीय

• मागील अंकीं नागपूर संमेलनांतील कांही बाबींसंबंधानें आम्हीं त्रोटकपणें आपले विचार व्यक्त केले होते. इतक्या सरळ मनानें व साध्या भाषेनें व्यक्त केलेल्या विचारांविषयी कोणी भलताच समज करून घेईल आणि आम्हांवर टीकेचें काहूर उठून थोडा तरी खुलासा करणें प्राप्त होईल अशी किंचित्‌हि कल्पना आम्हांस नव्हती. नागपुरास श्री. भवानीशंकर नियोगी कुलगुरु नागपूरविद्यापीठ यांनी स्वागताध्यक्षपद स्वीकारून संमेलनाचें नेतृत्व केलें. इतर अनेक थोर गृहस्थांनीहि संमेलनांत उत्साहानें भाग घेतला. नागपूरविद्यापीठांतील बरीच अध्यापकमंडळीहि सर्वप्रकारें संमेलनासाठी झटत होती. कुलगुरु आले आणि म्हणूनच ही अध्यापक मंडळी आली असें आम्हीं कधीहि लिहिलें नव्हतें. पण कुलगुरूंच्या उदाहरणानें अध्यापकवर्गास विशेषच प्रोत्साहन मिळालें असलें पाहिजे हें उघड आहे. अध्यापकवर्गानें अत्यंत निरलसपणें जी सेवा संमेलनप्रसंगीं केली तिच्या स्वयंस्फूर्तेला यामुळे कांही कमीपणा येतो असें कोणासहि वाटण्याचें कारण नाही.

* * *

राजवाडे यांच्या व्युत्पत्तीसंबंधीं रा. मोडक यांचा लेख या अंकांत छापला आहे. आम्ही राजवाडे यांचे शिष्य म्हणवितों, परंतु ‘ राजवाडेवाक्यं प्रमाणम् ’ अशी नीति खऱ्या राजवाडेशिष्यास कधीच रूचणार नाही. टीका खुशाल करा. पण गतव्यक्तीविषयी ती जर त्यांच्या अपसिद्धान्तांपुरतीच मर्यादित केली तर बरें. रा. मोडक एकदा रा. राजवाडे यांस मी चूक म्हणत नाहीं असें म्हणून मग त्यांचें ‘ प्रमादचक्र ’ पुढे मांडतात ही विसंगति नव्हे काय ? असो. रा. मोडक यांनी आपले लेख या दोषापासून दूर ठेवण्यानें त्यांच्या लेखांची योग्यता वाढणार आहे.

* * *

रावब० बांबर्डेकर यांचा लेखहि आम्हीं मुद्यापुरता संक्षेप करून दिला आहे.

---

# नियामक मंडळ

## (१) अधिकारपरत्वें सभासद

१ श्री. स. मा. वि. किबे, (अध्यक्ष), इंदूर
२ प्रो. वा. म. जोशी, (उपाध्यक्ष), पुणें
३ श्री. न. चिं. केळकर, ( ,, ), पुणें
४ प्रो. पां. वा. काणे, (उपाध्यक्ष), मुंबई
५ श्री. चिं. वि. वैद्य, ( ,, ), मुंबई
६ श्री. श्री. कृ. कोल्हटकर (,,), जळगांव

## (२) स्वीकृत सभासद

७ श्री. चिं. ग. कर्वे, पुणें
८ प्रो. दे. द. वाडेकर, पुणें
९ प्रि. ध. रा. गाडगीळ, पुणें
१० प्रो. रा. श्री. जोग, सांगली
११ श्री. य. रा. दाते, पुणें
१२ प्रो. दा. ग. पाध्ये, नाशिक
१३ प्रि. प्र. के. अत्रे, पुणें
१४ श्री. रा. दा. देसाई, पुणें
१५ श्री. रा. ग. हर्षे, पुणें
१६ श्री. द. अ. तुळजापूरकर, मुंबई

## (३) प्रादेशिक सभासद

१७ रे. भा. कृ. उजगरे, सासवड
१८ श्री. शं. वा. किर्लोस्कर, किर्लोस्करवाडी
१९ श्री. वि. द. घाटे, अहमदाबाद
२० श्री. नी. शं. नवरे, सोलापूर
२१ श्री. दे. ना. टिळक, नाशिक
२२ श्री. वा. ना. फडणीस, जळगांव
२३ श्री. शं. श्री. देव, धुळें
२४ श्री. ना. गो. चापेकर, बदलापूर
२५ श्री. ज. वि. लेले, अलिबाग
२६ श्री. र. कृ. पाटणकर, राजापूर
२७ श्री. कृ. पां. कुलकर्णी, सातारा
२८ प्रो. द. वा. पोतदार, पुणें
२९ प्रो. वा. गो. मायदेव, पुणें
३० श्री. शं. के. कानेटकर, फलटण
३१ श्री. श्री. दा. सातवळेकर, औंध
३२ श्री. ना. म. भिडे, भोर
३३ श्री. कृ. प्र. खाडिलकर, मुंबई
३४ श्री. ज. र. घारपुरे, मुंबई
३५ श्री. गं. दे. खानोलकर, मुंबई
३६ श्री. के. ना. काळे, मुंबई
३७ श्री. वा. ल. चिपळूणकर, अकोला
३८ डॉ. भा. म. टेंबे, यवतमाळ
३९ श्री. बा. ग. खापर्डे, उमरावती
४० श्री. या. मा. काळे, बुलढाणा
४१ प्रो. शं. दा. पेंडसे, नागपूर
४२ प्रो. श्री. ना. बनहट्टी, नागपूर
४३ प्रो. ना. के. बेहेरे, नागपूर
४४ श्री. के. वि. फणसे, सिहोरा
४५ श्री. गो. अ. ओगले, नागपूर
४६ श्री. दे. ल. महाजन, नांदेड
४७ श्री. का. सी. वैद्य, हैद्राबाद
४८ श्री. त्रिंबकराजा बहादुर, हैद्राबाद
४९ श्री. पां. वा. जोशी, हैद्राबाद
५० प्रो. श्री. रा. पारसनीस, सातारा
५१ प्रो. मा. त्रिं. पटवर्धन, कोल्हापूर
५२ श्री. गो. शि. उपळेकर, कोल्हापूर
५३ श्री. द. त्र्यं. पै, मडगांव
५४ डॉ. के. वा. साठे, बेळगांव
५५ श्री. भा. रा. पटवर्धन, धारवाड
५६ दि. ब. अ. बा. लठ्ठे, बेळगांव
५७ प्रो. चिं. वि. जोशी, बडोदें
५८ श्री. ग. वा. मावळणकर, अहमदाबाद
५९ रा. सा. र. छ. जोशी, सुरत
६० सौ. कमलाबाईसाहेब किबे, इंदूर
६१ प्रो. वा. गो. ऊर्ध्वरेषे, इंदूर
६२ श्री. वि. सी. सरवटे, इंदूर
६३ प्रो. गं. गो. कानेटकर, जबलपूर
६४ प्रो. प्र. वा. बापट, ग्वाल्हेर
६५ प्रो. व. ग. खापर्डे, बनारस
६६ श्री. ग. गं. जांभेकर, पुणें
६७ डॉ. शं. पु. आघारकर, कलकत्ता
६८ [illegible] ताराबाई सहस्रबुद्धे, मद्रास

# महाराष्ट्र साहित्यांत नवीन उत्कृष्ट भर

## महाराष्ट्र साहित्य पत्रिकेचीं पहिलीं चार वर्षें

अर्थात्

## पत्रिकेच्या अंकांचीं वर्षवार बांधलेलीं चार पुस्तकें

दर पुस्तकांत अभिप्राय, ऐतिहासिक, चरित्र, निबंध, पुस्तकपरीक्षण, भाषिक, शंकाचर्चा, सामाजिक इत्यादि विषयवार सदरें असून, सर्व मिळून महाराष्ट्र-भाषा, वाङ्मय, समाज, इतिहास यासारख्या विविध क्षेत्रांतील नवीन विद्वत्ताप्रचुर विचार आणि माहिती मिळणार आहे.

भाषिक—प्राकृत, मराठीचे कालिक व प्रांतिक भेद, म्हणी; पारिभाषिक शब्द; विविध शब्दसंग्रह; व्याकरण; व्युत्पत्ति; लिपी; जुने गद्य–पद्य इ०

सामाजिक—जुन्या कथा; गाणीं; सामाजिक टांचणें; खेळ; तोडगे; व्रतें; संस्कारपद्धती; जुन्या चालीरीती; जातींची माहिती इ०

निबंध—कृषिशास्त्र; भूघटना; आयुर्वेद; तत्त्वज्ञान; वेद; काव्य इत्यादि विषय.

ऐतिहासिक—अलीबहाद्दरांस पत्रें; शिलालेख; शालिवाहन शक; पत्रें; हकीकत तालुके रायगड; पेशवाईच्या सावलींत; बोधले घराणें बखर इ०

चरित्र—अश्वघोषाचें बुद्धचरित्र; वि. का. राजवाडे; वि. कों. ओक इ०

ग्रंथ—निरुक्ताचें भाषांतर; मराठी वाङ्मयाचा इतिहास; भांडीरभाषा व्याकरण.

शंकाचर्चाः—यांत शब्द, वाक्यरचना, प्रचार, व्युत्पत्ति, गाणीं इ. अनेक गोष्टींवर शंकाचर्चा आल्या आहेत.

पुस्तकपरीक्षणः—कांहीं महत्त्वाच्या ग्रंथांवर पांडित्यपूर्ण विस्तृत टीका असून हा भाग परीक्षणक्षेत्रांत अगदीं नवीन आहे. मराठी वाङ्मयाचें एक स्वतंत्र दालन यामुळे नवीन उघडलें गेलें आहे.

किंमतः—सुंदर कापडी बांधणी विषयसूचीसह. दर वर्षाच्या पुस्तकास ३ रुपये; एकदम पहिल्या चार वर्षांचीं पुस्तकें १० रु. स. ट. ह. निराळा.

वि. सू.—पांचव्या वर्षाच्या पुस्तकांच्याहि बांधीव प्रती तयार आहेत. परंतु या प्रतींस प्रत्येकीं ४ रुपये पडतील. ट. ख. वेगळा.

चिटणीस, म. सा. परिषद, पुणें.

आर्यसंस्कृति-मुद्रणालय, चिमणबाग, टिळकरस्ता, पुणें येथे लक्ष्मण नारायण चापेकर यांनी छापिलें व पुणें येथे महाराष्ट्र–साहित्य–परिषदेच्या कार्यालयांत (१९६ [७९] सदाशिव पेठ, पुणें २) परिषदेकरितां ना. गो. चापेकर यांनी प्रसिद्ध केलें.

अनुक्रमणिका






